# FEMALE EDUCATION.

## A PRIZE ESSAY.

# स्त्रीविद्याभ्यासनिबंध.



"सुंदर स्त्री विवेकहीन असली तर जसी डुकराच्या नाकाऱ्यांत सोन्याची नथ तसी आहे."

"सद्गुणी स्त्री कोणाला सांपडेल? तिचें मूल्य माणकापेक्षां थोर आहे."

"घर आणि धन पितृप्राप्त विभाग आहेत; परंतु बुद्धिमती बायको ईश्वरदत्त आहे."

---

BOMBAY TRACT AND BOOK SOCIETY.
1,000 Copies, Maráthí, 1852.

मुंबईमध्यें अमेरिकन मिशन छापखान्यांत छापिलें.
सन १८५२.

# सूचना.

सन १८५१ वर्षांत मुंबईतील पुस्तकें व निबंध करणाऱ्या मंडळीनें प्रसिद्ध केलें होतें कीं, स्त्रीसुधारण्याविषयीं जो कोणी मराठी ग्रंथ उत्तम रचील त्यास शंभर रुपये बक्षीस मिळतील. आणि त्याप्रमाणें पांच निबंध लिहून त्या मंडळीकडे आले होते व ते परीक्षकांनी वाचून त्यांतील एक उत्तम ठरविला; नंतर चिठी फोडून पाहिली तों राजमान्य राजश्री बाबा पदमणजी यांचें नांव निघालें, व त्यांस १०० रुपये देऊन तो ग्रंथ सर्वांच्या उपयोगी पडावा ह्मणून हल्लीं छापला आहे. त्याच्या खालोखाल वेदशास्त्र संपन्न गोविंद शास्त्री लेले यानी लि[illegible]ता[illegible] चांगला वाटून मंडळीने खुशीने त्यांस ५० रुपये बक्षीस दिल्हे; आणि कदाचित तो ग्रंथहि छापला जाईल.

# प्रस्तावना.

[illegible]यांस विद्या शिकवून त्यांची सुधारणूक करणें, त्यांस त्यांच्या योग्यतेप्रमाणें मान देणें व त्यांच्या कल्याणाची काळजी बाळगणें, हें हिंदु लोकांच्या विचारास विरुद्ध वाटतें आणि केवळ इतकेंच नाहीं, तर असें केलें असतां त्यांत अधर्म पडतो, असी त्यांची समजून पडून गेली आहे. त्यांच्या मतें स्त्रियांनी निरंतर दासपणांत वागावें, त्यांनी विद्या शिकूं नये, सुशिक्षित होऊं नये, धर्म जाणूं नये, परपुरुषाबरोबर भाषण करूं नये, पुरुषाच्या मंडळींत जाऊं नये, पुरुषांच्या विचारांत आपलें मत देऊं नये; सारांश त्यांनी कोणत्याहि गोष्टींत पुरुषाची बरोबरी करूं नये. आणि या मूर्खसमजुतीच्या पुष्टीकरणार्थ ते, स्त्रियांची ज्यांत निंदा केली आहे, असीं आपल्या शास्त्रांतील वाक्यें काढून दाखवितात, व ह्मणतात कीं, पूर्वी मोठमोठे विद्वान व ज्ञानसंपन्न ऋषी होऊन गेले त्यांनी जें लिहिलें आहे तें खोटें कीं काय? परंतु असा वृथाभिमान बाळगिल्यामुळें आपल्या देशाची अवस्था कसी झाली आहे, ती त्यांच्या लक्षांत येत नाहीं. त्यांच्या स्त्रिया अशिक्षित असल्यामुळें त्या किती नीचावस्थेंत आहेत, हें ते पाहत नाहींत. [illegible] उपायांनी सुख प्राप्त होईल, व त्या सर्व सुधारलेल्या लोकां[illegible] योग्य कशा होतील, ह्या कल्पना त्यांच्या स्वप्नीं देखील येत नाहींत. जे परोपकारी पुरुष या देशाच्या कल्याणाची व सुखाची काळजी बाळगितात, त्यांस मात्र एथील स्त्रियांची दशा पाहून फार कळवळा येतो. त्यांस वाटतें कीं हा देश उत्तमावस्थेस यावा, असी जर आपण इच्छा धरिली, तर इकडील बायकांच्या स्थितीकडे अवश्य लक्ष दिलें पाहिजे; व हरएक प्रयत्न करून त्यांस विद्या शिकविली पाहिजे; तरच ईश्वरकृपेनें त्यांचें अज्ञान दूर होऊन त्या आपल्या पतीच्या चांगल्या सखिकर्त्या व आवडत्या होतील; आपल्या मुलांस उत्तम बोध व शिक्षा करितील, व आपला संसार दक्षतेनें चालवितील. तर या प्रकारची काळजी पाहून प्रयत्न करणाऱ्या पुरुषांतील एका कृपाळु गृहस्थानें एथील स्त्रियांची स्थिती सुधारून त्या सुशिक्षित व्हाव्या, ह्याविषयीं ग्रंथ

लिहिण्यास एथील लोकांस उत्तेजन दिलें आहे. त्यावरून मी आपल्या सामर्थ्याप्रमाणें हा विषय लिहिण्याचें हातीं घेतलें आहे. बुद्धिदाता व ग्रंथास फळ देता ईश्वर आहे.

हा निबंध वाचणाऱ्यांस मनोरंजक व्हावा व यांत जो विषय आहे, त्याजविषयीं हिंदु लोकांचें मत कोणत्या प्रकारचें आहे, तें पुरतेपणीं स्पष्ट-करून दाखवितां यावें, ह्मणून एथें काल्पनीक संवादाची योजना केली आहे.

या संवादाचे दोन भाग केले आहेत. पहिल्या भागांत स्त्रियांस विद्या न शिकवावी ह्मणून हिंदु लोक ज्या शंका आणितात, त्यांचें यथामति समाधान केलें आहे. आणि दुसऱ्या भागांत विद्येपासून स्त्रियांस कोणते लाभ आणि संतोष प्राप्त होतील, ते संक्षेपानें दाखविले आहेत.

---

# स्त्रीविद्याभ्यासनिबंध.

---

## संवाद १.

कोणी एक तरुण विद्वान ब्राह्मण, आपल्या इष्टमित्रांस भेटण्याकरितां मुंबईहून पुण्यास जावयास निघाला. तो तेथें पोहंचल्यावर प्रथम त्यास रस्त्यामध्यें त्याचा स्नेही एक द्रव्यवान वृद्ध गृहस्थ भेटला; त्याने त्यास मोठ्या विनयाने व अति आग्रहाने आपल्या घरीं नेलें. घरीं पोहंचल्यावर त्यांनी परस्परांस प्रीतीचें आलिंगन देऊन क्षेम कुशळ विचारिलें. नंतर भोजनोत्तर ते दोघे जण दिवाणखान्यांत बसायास गेले. तितक्यांत घरच्या यजमानाचीं मुलें तेथें खेळावयास आलीं, त्यांस पाहून पाहुण्यास आपल्या बराबर आणलेल्या मेवामिठाईची आठवण पडली, आणि त्यांतून कांहीं त्या मुलांस द्यावें ह्मणून त्याने आपली पेटी उघडली. तींत वरच कांहीं इंग्रजी व मराठीं वर्त्तमानपत्रें होतीं, तीं खालीं जमिनीवर ठेवून तो बेदाणा, अंजिरें वगैरे काढीत आहे, इतक्यांत त्या यजमानाच्या एका लहान मुलीने त्यांतील ज्ञानोदय नामक वर्त्तमानपत्र हातांत घेऊन आपल्या बापाजवळ धांव मारिली; तिच्या मागून हा गृहस्थहि पेटी बंद करून हातांत तबक घेऊन आला. तें पाहून यजमान आपल्या मुलीस

ह्मणतो; अगे भागिरथी, तूं त्या कागदाला कापि धुऊन पिसील? तो पाहा, काकाने तुला खाऊ आणिला आहे. तो घे, आणि हा कागद त्या शिवरामाला दे; आणि त्यास सांग कीं, "हा घे तूं कागद, बैस वाचीत; आह्मा बायकांस हा धंदा नको," हें ऐकतांच त्या मुलीने तो ज्ञानोदय, आपला वडील भाऊ शिवराम, यास दिल्हा. हें सर्व त्या तरूण विद्वानाने पाहून तो भागिरथीस ह्मणतो, काय मुली, तुला तें पत्र वाचायास येत नाहीं? त्यास ती लाजून उत्तर देती, "नाहीं महाराज. आणि आह्मा मुलींच्या जातीस कशास वाचणें पाहिजे? लिहिणें शिकून आह्मा बायकांस काय करायाचें आहे? आणि जर मी शिकलें, तर दुसऱ्या बायका माझी थट्टा करून ह्मणतील कीं, आतां आपल्या नवऱ्यास घरीं बसवून तूं चाकरी करून पैका मिळवून आण; अथवा तो बाहेर गावीं चाकरी करावयास गेला ह्मणजे त्यास पत्रें पाठवीत जा; व तो तुला खर्चायास हुंडीचिट्ठी पाठवीत जाईल." हें तिचें बोलणें ऐकून ते हसूं लागले.

नंतर त्या तरूण विद्वानाने आपल्या मनांत निश्चय केला कीं स्त्रियांस विद्येच्या योगाने सुशिक्षित करण्याविषयींची गोष्ट ह्या वृद्ध गृहस्थास वादविवादाच्या अंतीं सिद्ध करून दाखवावयास ही चांगली संधी आहे. आणि ईश्वर कृपेकरून तशी गोष्ट घडून आली तर भागिरथीस विद्याभ्यासाकरितां मुंबईस आपल्या घरीं घेऊन जाऊं, ह्मणजे विद्येपासून जे अमोलिक लाभ आणि संतोष होतात, ते तिला प्राप्त होतील; व जश्या इतर स्त्रिया अज्ञा-

नांत वाढतात, तसी ती न वाढतां चांगली विद्वान व सुशिक्षित होईल.

(असें कल्पून, तो तिच्या बापापाशीं बोलतो)

**तरुण विद्वान.**– महाराज, आपण एक आनंदाची गोष्ट ऐकिली आहे काय?

**वृद्ध गृहस्थ.**– नाहीं. ती कोणती बरें?

**त० वि०**– आमच्या मुंबईंत 'पुस्तकें व निबंध करणारी' या नांवाची एक साहेब लोकांची मंडळी आहे. तिच्या कोणी एका साहेबाने कृपाळू होऊन शंभर रुपये स्वाधीन केले आहेत. आणि असें सांगितलें आहे कीं जो कोणी, "स्त्रियांस विद्या शिकविणें," ह्या विषयावर उत्तम ग्रंथ लिहील, त्यास ते रुपये द्यावे; त्यावरून त्या मंडलीने त्याच्या इच्छेप्रमाणें जाहिरात प्रसिद्ध केली आहे. आपल्या शिवरामाचे हातांत जें ज्ञानोदय वर्त्तमान पत्र आहे; त्यांत त्याचा सविस्तर मजकूर लिहिला आहे. आपण तें वाचलें असतां समजेल.

**वृ० गृ०**– हीच कायती सुवार्त्ता! इलाच तुह्मी आनंदाची गोष्ट ह्मणतां? ही तर कुवार्त्ता आहे. मला वाटतें कीं, आतां कलीचा अंमल पुरता बसला. पैक्याच्या लालचीने कोणी तरी हा निबंध लिहीलच. मग लोक त्यांतील गोष्टी वाचूं लागतील व ज्याचें मन फिरेल, तो आपल्या मुलीस लिहिणें शिकवूं लागेल; व पुढें हळू हळू सर्व बायका लिहूं वाचूं लागल्या ह्मणजे अनर्थाची पाळी ओढवेल.

**त० वि०**– कां महाराज, असें कां ह्मणतां? आह्मा हिंदु लोकांच्या सुखाची काळजी बाळगून जे परोपकारी

गृहस्थ आपला पैका व बुद्धि खर्च करितात, त्यांच्या स्तुत्य उद्योगास व श्रमास आणि त्यापासून जें सुफळ प्राप्त होणार, त्यास तुह्मी निष्कारण दूषणें कां देतां?

**वृ० गृ०**– दूषणें ह्मणजे? – जें वास्तवीक आहे, तें सांगतों. आतां धर्म बुडायाची वेळ आली आहे. आपल्या वाडवडिलांनीं कधीं स्त्रियांस लिहिणें वाचणें शिकविलें होतें कीं काय? आणि तुह्मीच ही नवी चाल कोठून काढतां?

**न० वि०**– खरें. आपल्या वडिलांस ही गोष्ट सुचली नाहीं ह्मणून आतां आपणास समजूं लागल्यावर, जर तींत आपलें वास्तवीक हित आहे, असें अनुभवास आलें, तर ती कां करूं नये? इतकेंच कीं, ती निर्दोष असली पुरे.

**वृ० गृ०**– काय, तुह्मी ह्मणतां कीं, स्त्रियांस विद्या शिकविण्याची चाल निर्दोष व लाभदायक आहे? मुळीं पुरुष जातींत तरी सर्वांनीं विद्या शिकावी कीं काय? पाहा, आतां इंग्रजी झाल्यापासून विद्या किती वाढली? कोळी, माळी, भंडारी, महार पोर, वाणी बकाल, सर्व विद्या शिकूं लागले आहेत, आणि तशांत अणखी बायकांनीहि विद्वान व्हावें ह्मणतां, मग ठीक काम आहे. जिकडे तिकडे बायकांचेंच प्राबल्य होईल. पंडितांस व शास्त्र्यांस कोण विचारील? त्यांचा मानहि कोणी राखणार नाहीं. शिकवा बाबानो! राज्य इंग्रजाचें आहे, आणि त्यांत प्राबल्य तुमचें आहे. कोण तुमचा हात धरील?

**न० वि०**– वडिल बाबा, आपण रागावूं नये. स्त्रि-

या विद्या शिकल्या असतां तुह्मासारिख्या विद्वानाचा मानभंग होणार नाहीं. त्या तुमच्या आज्ञेंत वागतील; त्यांस तुमची योग्यता समजेल; त्यांच्या अंगीं नम्रता येईल; त्यांस नाना प्रकारच्या चमत्कारिक, मनोरंजक, उपयोगी व बोधाच्या गोष्टी समजूं लागतील; सर्व प्रकारें तुमचें व त्यांचें कल्याण होईल. आमच्या मुंबईत कित्येक उदार व परोपकारी गृहस्थांनीं मुलींच्या शाळा स्थापिल्या आहेत. तेथें त्या चांगले प्रकारें अभ्यास करितात. कित्येक संभावित लोक त्यांची परिक्षा घेऊन जिचा अभ्यास चांगला झाला असेल, तिला पुस्तकें, चोळ्या किंवा परकर देतात व तिणें पुढें अधीक शिकावें ह्मणून उत्तेजन देतात. जर आपण भागीरथीस मजबराबर पाठवाल, तर ती तेथें चांगली सुशिक्षित होईल.

वृ० गृ०— मला वाटतें कीं, तुह्मी लवकरच दिवसा मशाली लावाल. तुह्मी आपल्या गावीं कसेंहि करा; परंतु या गोष्टी एथें आमचे पोरीजवळ तरी बोलूं नका. ती भागीरथी तर पराकाष्ठेची छांदिष्ट व हट्टी पोर आहे. तिने एकदां हें बुकाचें व साडीचोळीचें ऐकिलें ह्मणजे ती तुमच्या संगतीं गेल्याशिवाय राहणार नाहीं. तशांत तिची आजीहि नुकतीच तिकडे आपल्या लेकीच्या भेटीस गेली आहे. यास्तव आपण बोलल्यां इतकेंच पुरे. आतां कांहीं एकादी दुसरी गोष्ट काढा.

न० वि०— माहाराज, आपणास या गोष्टीचा इतका त्रास व भीति आहे हें पाहून मला मोठें दुःख व आश्चर्य वाटतें. तर आतां माझी अज्ञानाची विनंती ऐकावी. मजवर कृपा करून आपण वडीलपणाच्या

नाद्याने मला बुद्धिवाद सांगावा; व मी जें मत धरिलें आहे, तें खोटें व दूषणार्ह असल्यास त्याचे वादेंकरून खंडण करावें, व जर आपला वाद सुयुक्तिक, विचारास प्रमाण व ग्राह्य असला, तर मी आपली चूक पदरीं घेईन; तसें न झाल्यास मी जें सांगेन, तें सत्य असल्यास, आपण स्वीकारून मान्य केलें पाहिजे. आणि असें आहे कीं जर आपला मित्र आडवाटेने चालत असला, तर त्यास बोध करून खऱ्या मार्गावर आणावें हा आपला मनुष्यधर्म होय.

वृ० गृ०— बरें, तर तुमची काय इच्छा आहे?

न० वि०— माझी इच्छा हीच आहे कीं, स्त्रिया विद्या शिकल्या असतां, त्यांस कोणता लाभ किंवा हानी होईल, व आपण कोणत्या कारणावरून या उपयोगी चालीचा निषेध करितां हें सर्व सविस्तर सांगावें.

वृ० गृ०— तुह्मी मजजवळ त्यांच्या लाभाची गोष्ट बोलूंच नका. कारण, मला तर त्यांत एकहि फायदा दिसत नाहीं; परंतु जर गैर फायदे व असली धर्मभ्रष्ट चाल न चालविण्याचीं कारणें विचाराल, तर मात्र मजजवळ पुष्कळ आहेत.

न० वि०— फार चांगलें आहे. आतां आपला संवाद चालूं द्यावा. स्त्रिया सुशिक्षित झाल्याने कोणते लाभ होतील, हें प्रथम सांगावें.

वृ० गृ०— अहो लाभाची तर गोष्ट राहूं द्या पण मोठमोठाले अनर्थ मात्र होतील. ते अनुक्रमें सांगतों;

(१) स्त्रियांस विद्या शिकविली असतां त्या आपल्या नवऱ्यापेक्षां शाहण्या होऊन त्यांस उलटा उपदेश करूं

लागतील. त्यांची त्या भीड मर्यादा राखणार नाहींत; त्यांच्या अंगीं उद्धटपणा येईल व त्या आपल्या संसाराकडे दुर्लक्ष देऊन बुकेंच वाचीत बसतील.

(२) दुसरी हानी असी होईल कीं, त्यांस विद्या आली ह्मणजे अर्थातच त्या कोकशास्त्रादि पुस्तकें वाचूं लागतील. मग त्यांच्या मनांत व्यभिचारबुद्धि उत्पन्न होईल. आणि त्या आपलें पातिव्रत्य भ्रष्ट करितील. आमच्या पुण्यांत कसबिणींशिवाय दुसऱ्या कोणत्याहि बायका ल्याहावाचायास शिकत नाहींत. त्यांस लावण्या वगैरे शिकण्याकरितां विद्येची गरज लागती. त्यांप्रमाणें आह्मी आपल्या मुलींस विद्या शिकवून आमच्या कुळास व नांवास बट्टा लावून घ्यावा कीं काय? या दोन गोष्टींचें प्रथम उत्तर द्या. मग पुढें जें बोलायाचें तें बोलूं.

त० वि०– आतां याचें मी यथामति उत्तर देतों, तें आपण स्वस्थचित्तानें ऐकावें. आपण ह्मणतां कीं, "विद्येच्या योगानें स्त्रिया आपल्या पतीस मानणार नाहींत व त्या व्यभिचारिणी होतील." तर हें तुमचें बोलणें केवळ उपहासास्पद आहे, आणि याला कांहीं आधार नाहीं, असें मला वाटतें तुमच्या शास्त्रांत विद्येचीं जीं स्तुतिपर वाक्यें आहेत, तीं सर्व खोटीं असें सिद्ध करितां. तुह्मी ह्मणतां कीं, विद्या शिकल्यानें स्त्रियांच्या अंगीं उद्धटपणा येईल. तर महाराज, या गोष्टीचा आपणच विचार करून पाहावा. विद्येपासून चांगलें व वाईट असीं दोन्हीं फळें प्राप्त होतात, हें खरें, परंतु सुविद्या व सुशिक्षा यांचीं फळें वाईट आहेत कीं काय? "विद्यादधातिविनयं," या वाक्याचा आपणास विसर पडला काय?

अहो विद्या ह्मणजे कोणती ! ती शिकण्याचा हेतु कोणता असावा, व तिचे शिक्षक कोणत्या प्रकारचे मनुष्य असावे, या गोष्टींचा विचार करून, नंतर तुह्मी हा सिद्धांत केला कीं काय ? विद्या या शब्दाचा अर्थ "जाणणें," असा आहे. आणि त्याची व्याप्ती पाहिली असतां, मूल लिपीपासून ईश्वराच्या अपार ज्ञानापर्यंत आहे. आणि दुसरा अर्थ ह्मटला ह्मणजे चोरी करायास शिकणें, हीहि एक विद्या आहे, असें ह्मटलें तरी होतो. परंतु तुह्मास हा भेद समजत नाहीं. ज्या विद्येने मनुष्याचें मन प्रकाशित होतें, जिच्या ज्ञानरूप चक्षूने आपणास या जगांतील कृत्यांत त्यांच्या कर्त्याचें अपार चातुर्य, कौशल्य, पराक्रम, संकेत, दया, हीं दिसूं लागतात, जी, मनाचा गर्व हरण करून, नम्रता आणिते, ती विद्या स्त्रियांस शिकविली असतां, त्या आपल्या पतीचा मानभंग करणाऱ्या उद्धट, व व्यभिचारिणी अशा होतील कीं काय ? नाहीं. तर असें बोलणें, हें किती निरस व लाजिरवाणें आहे बरें ! ज्या विद्येंत ईश्वराच्या चरित्राचें व त्याच्या गुणाचें वर्णन केलें आहे, ती विद्या कोणीहि शिकली असतां तिजपासून वाईट फळ प्राप्त होईल, कीं काय ? तुमच्या मतें लिहिणें वाचणें, हीच विद्या व ती येथील नीच व दुष्ट स्त्रिया, ज्या बाजारांत दुकानें घालून पातक विकतात, त्यांसहि साध्य आहे ह्मणून ती आपल्या स्त्रियांस शिकविली असतां त्याहि त्यांप्रमाणेंच होतील असें भय बाळगितां; परंतु तें व्यर्थ आहे. त्या दुष्ट स्त्रियांच्या अवस्थेशीं व शिकण्याच्या हेतूसीं तुमच्या स्त्रियांची अवस्था व हेतु लावून पाहा. केवढें, जमीन अस्मा-

नाचें अंतर! त्यांची विद्या ती काय आहे? थोडेसें वाचायापुरतें मात्र त्या शिकतात. तें वाचणें पाहिलें तर काय असतें? मन व नीति यांस भ्रष्ट करणाऱ्या अशा कथा व लावण्या मात्र त्यांच्या हातीं मिळतात. तर त्यांपासून त्यांचे दुर्गुण वाढतील यांत काय आश्चर्य? असल्या शिकण्यास तुह्मी विद्या ह्मणतां काय! आणि त्यांचा जन्मादारभ्य व्यापार कशाचा असतो? त्यांची सर्व वेळ कशांत जाती? आणि अशा प्रकारच्या स्त्रियांपासून तुह्मी सद्गुणाचा व सदाचरणाचा कित्ता कां इच्छितां? गांवांतील मळ नेणाऱ्या घाणेरड्या नळांत निर्मळ पाण्याचा झरा कां व्यर्थ शोधितां. तुह्मी आपल्या मुलींस प्रारंभींच चांगली बोधाचीं व नीतिज्ञानाचीं पुस्तकें दिल्हीं व वाईट पुस्तकें त्यांस न दाखविलीं, ह्मणजे त्या कशाने बिघडतील? त्यांचीं मनें सदसद्विचारक्षम झालीं व त्यांची सदसद्विचार बुद्धि प्रकाशित झाली ह्मणजे त्या आपल्या पतींची आज्ञा भंग करणार नाहींत. त्यांस परमेश्वराचें ज्ञान प्राप्त झालें ह्मणजे त्या त्याची भीति धरून सदाचरणाने व पातिव्रत्याने वागतील. विशेष काय सांगावें? त्यांचें कुटुंब सर्व प्रकारें सुधारेल व सुखी नांदू लागेल.

वृ॰ गृ॰—(३) तुह्मी ह्मणतां तें खरें; परंतु या गोष्टीचा आमच्या स्त्रियांस काय उपयोग? ज्या स्थितींत सांप्रत त्या आहेत, ती त्यांस योग्य आहे. तिजविषयीं त्या कधीं कोणाजवळ गाऱ्हाणें सांगत नाहींत. आणि तुह्मा लोकांस त्यांचें कल्याण करण्याचा इतका निजध्यास कां लागला आहे? तुमच्या बुकांतील विद्येने काय

त्यास स्वर्गसुख प्राप्त होणार आहे? ईश्वरें त्यांस ज्या स्थितींत ठेवलें आहे, तींत त्या संतुष्ट व तृप्त आहेत.

न० वि०— तुह्मी ह्मणतां कीं, आमच्या स्त्रियांची स्थिती चांगली आहे व त्याविषयीं त्या कुरकुरत नाहींत. तर हें तुमच्या अभिप्रायाप्रमाणें पाहिलें असतां बरावर आहे. जन्मापासून जो अंध आहे, त्यास उजेड किंवा रंग ह्मणून काय पदार्थ आहे, हें कसें समजेल? व त्याची समजूत कोण करूं शकेल? तुमचीहि सांप्रत तसीच गत आहे. जे तुह्मी आज हजारों वर्षांपासून आपल्या स्त्रियांस दासीप्रमाणें वागवीत आलां आहां, त्या तुह्मास त्यांची उत्तम स्थिती कोणती हें काय ठाऊक? तसेंच तुमच्या स्त्रिया जन्मापासून मरणपर्यंत आपल्या मानेवर तुमचें जुकट वागवितात. त्यांस तरी तें कसें काढावें हें कोठून समजेल? त्यांस त्याचें ओझें वाटतें खरें; पण बापड्या काय करितील? त्याचें निवारण करण्याचा उपाय त्यांस कोठून सुचेल? कदाचित् एखादीस सुचला तरी तिणें कोणापासीं जावें? तिचें कोण ऐकतो? याप्रमाणें त्या अर्थातच निरूपाय होऊन "आले या भोगासीं असावें सादर" असें समजून आपल्या आयुष्याचे दिवस लोटितात.

आतां तुमच्या स्त्रियांची स्थिती कोणत्या प्रकारची आहे, हें सांगतों. तुह्मासारिख्या उत्तम पदवीच्या गृहस्थांच्या स्त्रियांस संसार खटल्याची फारसी काळजी नसती. अन्नवस्त्रादि सर्व सोई श्रम केल्यावांचून त्यांस प्राप्त होतात. इतक्यावरूनच तुह्मास वाटतें कीं, त्या सर्वस्वी सुखी आहेत. पण हें सुख मृगजलवत् आहे. पाहा, त्यांस तुह्मी किती बंदोबस्ताच्या बंदिखान्यांत टा-

कितां. त्यांस दरवाजाबाहेर जाण्यास केवढा प्रतिबंध आहे! कोणत्याहि पुरुषाबराबर त्यानी भाषण करूं नये, सर्व दिवस खोलींत किंवा घरांत बसून घालवावा, असी तुमची त्यांस कैद असती. त्या कोठें बाहेर गेल्या असतां त्यांच्या भोवतीं पडदे बांधिले पाहिजेत. याशिवाय स्त्रीने आपल्या पतीच्या जुलमी अखत्याराखालीं राहिलें पाहिजे. अणखी दुःखकारक गोष्ट असी आहे कीं, तुमच्या स्त्रियांच्या अज्ञानामुळें, त्यांच्या गुणांचें वर्णन करूं गेलें असतां त्यांस पशूचीच उपमा द्यावी लागती. त्या दोघांमध्यें भेद इतकाच कीं, त्यांस आपले अभिप्राय दुसऱ्यास बोलून दाखवितां येतात, व आपलें शरीर वस्त्रालंकारेंकरून मंडित करितां येतें; परंतु पशूंस ते गुण नाहींत, व ते चार पायांवर चालतात; इतकाच त्यांमध्यें भेद आहे.

वृ० गृ०— हें मोठ्या निष्ठुरतेचें बोलणें आहे. यांत फारच अतिशयोक्ती आहे. तुह्मास पशू व मनुष्य जात एकच दिसती; वाहावा, आमच्या सर्व बायका गोठ्यांतील गाई ह्मशीप्रमाणें आहेत, असें तुमच्या मतें ठरलें.

म० वि०— गोठ्यांतील गाई ह्मशी होण्यास लांब कान व शिंगें नकोत, पण गुणाची व बुद्धीची परीक्षा केली ह्मणजे सहजच योग्यता समजती. याविषयीं आपणास स्पष्टार्थ पाहिजे असला तर पशूच्या व तुमच्या स्त्रियांच्या गुणांची तुळणा करून पाहावी. पशूपक्षी जितका आपल्या संसाराचा उद्योग करितात, व आपल्या बाळकांवर प्रीति करितात, तितकाच उद्योग, व तेवढीच प्रीति मनुष्याने आपल्या संसारांत व आपल्या मुलांवर

केली तर त्यांत काय विशेष आहे? ईश्वराने मनुष्यास सत्य, सौख्य, ज्ञान इत्यादि प्राप्त करून घेण्याचीं व त्यापासून सुख भोगण्याचीं साधनें करून दिल्हीं असतां त्याचा उपयोग न करितां जे आपल्या पोटाचाच उद्योग पाहतात, त्यांस पशू नाहीं तर काय ह्मणावें? जर "विद्या विहीनःपशुः" हें पद शास्त्राहीं अविद्वान पुरुषास दिल्हें आहे, तर मग अविद्वान स्त्रीस पशूची उपमा दिल्ही असतां त्यांत काय दोष आहे? त्यांत कोणता कठोरपणा दिसला.

वृ० गृ०— आतां तुमचें बोलणें मला कबूल करणें प्राप्त आहे; परंतु माझी अणखी एक शंका असी आहे कीं, (४) स्त्रियांस विद्या शिकवून त्या सुधारतील, ही आशा बाळगणें केवळ भ्रांती आहे. कारण त्यांचे स्वाभाविक गूण पुरुषाप्रमाणें नाहींत. विद्या कितीहि चांगली असली, तरी तिचे त्यांच्या ठाईं चांगलें फळ येणार नाहीं. जसें सर्पास दूध पाजलें असतां तो विषच वमन करील, त्याप्रमाणें स्त्रियांपासून विद्येचा सदुपयोग सर्वथैव घडणार नाहीं; त्या आपले स्वाभावीक दुष्ट, कपटी व नीच गूण प्रगट केल्याविना कधीं राहणार नाहींत.

त० वि०— तुह्मी स्त्रियांच्या स्वभावाविषयीं सर्पाचें उदाहरण दिलें, त्यांतील प्रतिज्ञावाक्य खरें आहे ह्मणून त्यापासून जें निगमन तुह्मी सिद्ध केलें, तें मी कधीं कबूल करणार नाहीं. सर्पास पाजलेल्या दुधाचें वीष होतें, ही गोष्ट कदाचित सिद्ध करून देतां येईल, कारण त्याच्या आंगींच विष आहे. परंतु त्याप्रमाणें स्त्रियांचाच स्वभाव मुळचा दुष्ट व नीच आहे, व त्यांस विद्येपासून अनिष्ट फळें उत्पन्न होतील, हें तुमच्याने सिद्ध

करून देतां येणार नाहीं. तर आतां पुरुषाप्रमाणेंच स्त्रियांस विद्या शिकण्याचा अधिकार, शक्ति व अवश्यकता कसी आहे व त्यांचा स्वभाव मुळचा दुष्ट नाहीं, हें सांगतों.

प्रथम तुह्मी ह्मणतां कीं, स्त्रियांचा स्वभाव पुरुषाप्रमाणें नाहीं. तर याचें उत्तर देण्यापूर्वी मला आपणास एक गोष्ट सुचवूं द्या कीं, या जगांतील सर्व मनुष्यें परमेश्वराच्या पवित्र आज्ञा उलंघून भ्रष्ट झालीं आहेत. तेणेकरून त्या सर्वांचीं अंतःकरणें, वासना, कल्पना, कर्में, हीं पापी आहेत. परंतु आपण हा अर्थ मनांत आणून बोलत नाहींत. आपल्या मतें ईश्वराने स्त्रियांसच दुष्ट स्वभाव दिल्हा आहे, तर असी गोष्ट नाहीं. त्याने स्त्रीपुरुषांचा स्वभाव सारखाच केला आहे, हें अनुमानावरून व प्रत्यक्ष प्रमाणावरून स्पष्ट कळूं येतें. तुह्मी विचार करा कीं, मनुष्योत्पत्तीच्या पूर्वीं परमेश्वराने हें जग उत्पन्न केलें, तेव्हां त्याची स्तुति गाणारा असा एक तरी प्राणि होता कीं काय? सर्व पदार्थ त्याचें अद्भुत हस्तकौशल्य, पराक्रम इत्यादि गुण दाखविणारे मात्र होते. मग त्याने सर्व पृथ्वी व तिजवरील पदार्थांची सिद्धता करून एक बुद्धिमंत प्राणी उत्पन्न केला. आणि त्यास सर्वांचें अधिपत्य देऊन त्याने त्याचा उपभोग घ्यावा ह्मणून त्यास बुद्धि, ज्ञान, विचार, स्मृति, कल्पनाशक्ति इत्यादि मनोधर्म दिल्हे. आणि असा सकलगुणसंपन्न जो परमेश्वराच्या अद्भुत क्रियेचा पुतळा, त्यास दुसरा एक सोबती उत्पन्न करून दिल्हा, तो कोणता ह्मणाल तर, स्त्री; बरें, आतां अशा चतुर व गुणसंपन्न मनुष्याचा हा मित्र,

त्याच्या गुणास व पदवीस अयोग्य असा असेल कीं काय! याविषयीं तुह्मी आपल्या व्यवहारांतील गोष्टिचेंच उदाहरण घ्या. जर कोणा धनवान मनुष्यास आपल्या पुत्राचें लग्न कर्तव्य आहे, तर तो त्याला एखाद्या कंगाल पुरुषाच्या अथवा नीच व अप्रतिष्ठित कुळांतील मनुष्याच्या मुलीचा संबंध करून देईल कीं काय? जर त्याचा मुलगा सुंदर व गौरवर्ण, मदनासारिखा आहे, तर त्याला कुरूप, कृष्ण वर्ण व कुब्जेसारिखी असी बायको करून देईल कीं काय? नाहीं. निश्चयेंकरून नाहीं असा जोडा कधीं जमणार नाहीं. बरें, तर मग अल्पबुद्धि असे जे आपण मनुष्य ते (आपल्या मुलास नवरी पाहण्याकरितां) इतकी चौकशी व परीक्षा करितों, तर त्रिकालज्ञानी व सर्वज्ञ जो आपला जगत्कर्ता पिता, त्याने प्रारंभीं मनुष्यास जी स्त्री दिल्ही असेल, तिच्या गुणांत किंचित तरी व्यंग ठेविलें असेल कीं काय? ती त्यास सर्व प्रकारें योग्य व शोभायाजोगीच असेल. ख्रिस्ती लोकांच्या शास्त्रांत तर असें लिहिलें आहे कीं, देवाने मनुष्याच्याच फासोळीपासून त्याजकरितां स्त्री उत्पन्न केली. आणि यावरून तिला तिच्या नवऱ्याने आपल्या "हाडांतील हाड आणि मासांतील मास," असें ह्मटलें. याचा अर्थ असा होतो कीं, स्त्री आणि पुरुष हीं एक देहरूप आहेत. असें असतां तिचे व पुरुषाचे स्वभाव तुह्मी ह्मणतां त्याप्रमाणें अगदीं निरनिराळे कसे होतील? तर ह्या गोष्टीवरून असें सिद्ध होतें कीं स्त्रियांस पुरुषाप्रमाणें "देह मन बुद्धि हीं आहेत. ईश्वराने कांहीं न्युनाधिक्य केलें नाहीं. फक्त इतकेंच कीं, बायका स्वभाव व शक्तीकडून

घरांतील कारभारांस योग्य आहेत, व पुरुष घराबाहेरचे कामास योग्य आहेत." पुरुषाच्या शरिरांत जें अन्न पाचन होतें, तसेंच स्त्रियाच्याहि शरिरीं होतें; व जसा पुरुषाचे मनास व आत्म्यास विद्या, ज्ञान, बुद्धी, धर्म, यांचा आहार पाहिजे, तसेंच स्त्रियांसहि ज्ञानाचें व धर्माचें खाजें पाहिजे. आणि तें सर्पास पाजलेल्या दुधाप्रमाणें विष व्हावयाचें नाहीं.

वृ० गृ०– (५) तुह्मी ह्मणतां ही गोष्ट खरी; मी ती अमान्य करीत नाहीं. परंतु तुमच्या मुखांतून जो शब्दवर्षाव झाला, त्याच्या लोंढ्यानें तुमचा मत्त वृक्ष वाहून गेला. त्याचें खंडण करण्याची माझी मेहनत वांचली. तुह्मी ह्मणतां कीं, "स्त्रिया घरांतील कामास योग्य आहेत" ह्मणूनच त्यांस विद्येचा काय उपयोग पडेल बरें? त्यांस चाकरी अथवा व्यापार करून द्रव्यसंपादन करायाचें नाहीं, तसेंच त्यांस पंतोजीपणा करायाचा नाहीं. किंवा त्या मोठ्या विद्वान झाल्या ह्मणजे सभेंत बसून शास्त्री पंडितांबराबर वादविवाद करायास योग्य नाहींत. आणि तुह्मी व्यर्थ अविचारी माणसाप्रमाणें भलत्याच गोष्टीवर कां विश्वास ठेवितां, व दुसऱ्यासहि कां अज्ञान शिकवूं पाहतां? असें करणें हें तुह्मास मोठें लांच्छन आहे. आह्मासारिखे वृद्ध, ज्यांच्या बुद्धीस मांद्य आलें आहे, ज्यांस फार बोलवत नाहीं, त्यांस शेंकडो प्रमाणें आणून व खंडीभर शब्द बोलून कां स्तब्ध करितां? परंतु या सर्व तुमच्या वल्गना आहेत. यांपासून कोणाचेंहि हीत होणार नाहीं.

त० वि०– ठीकच आहे. आपलें प्रमाण लागू न

पडतां उलटें त्याचें खंडण झालें ह्मणून मतिकुंठित होऊन आपण स्तब्ध राहिलां, यांत आश्चर्य नाहीं. असो, आतां तुह्मी जी शंका काढली आहे, तिजविषयीं कांहीं बोलण्यास मला आज्ञा असावी. "स्त्रिया घरांतील कामास योग्य आहेत," हें माझें बोलणें घेऊन आपण त्यावर टीका केली कीं 'असें असल्यास त्यांस विद्येचा काय उपयोग पडेल बरें ? त्यांस चाकरी किंवा पंतोजीपणा करायाचा नाहीं, इत्यादि पुष्कळ ह्मणालां. तर त्याविषयीं मी थोडेसें बोलतों.

कोणतेंहि कसब किंवा चाकरी करून पोट भरण्यापुरताच जर विद्येचा उपयोग असता, तर आजपर्यंत या पृथ्वींत एकहि मनुष्य "विद्वान" हें पद पावला नसता; मनुष्याचें ज्ञान वृद्धिंगत झालें नसतें. जसीं जनावरें उदरनिर्वाहाकरितां मात्र कांहीं श्रम किंवा उद्योग करितात, तसीं जर सर्व मनुष्यें पोटाची कोथळी भरण्यापुर्तीच व्यवसाय करून राहतीं तर आजपर्यंत जीं मोठमोठीं राज्यें व जे महाज्ञानी, पराक्रमी, व शूर होऊन गेले व जे सांप्रत आहेत, ते कोठून झाले असते ? जगाच्या गतकालाचा वृत्तांत आपणास समजण्याचें कांहींच साधन राहिलें नसतें. आजपर्यंत विद्या, कला, कौशल्यें इत्यादिकाविषयीं जे अमोल्य शोध व ग्रंथ झाले आहेत, त्यांच्या कर्त्यांनी जर द्रव्य संपादन करण्यापुर्तीच विद्या केली असती, तर आज जीं सुखें आपण अनुभवितू आहों, व सुधारणुकेच्या ज्या पायरीवर चढलों आहों, तीं कोठून प्राप्त झालीं असतीं ? त्या विद्वानाचा उद्योग कारकुनीचा किंवा व्यापाराचा होता, असें ह्मणूं नका. पोट-

पूजा करावी या उद्देशानेच त्यांनीं विद्या संपादन केली असें नाहीं. तर त्यांच्या उपजीविकेचा धंदा फार निराळा होता. जे मोठमोठाले विद्वान होऊन गेले, ज्यांनी आपल्या विद्येच्या चमत्काराने जगास आश्चर्य करायास लाविलें, व आपल्या ज्ञानाने लोकांचें अज्ञान दूर केलें, त्यांमध्यें कोणी सुतार, कोणी लोहार, कोणी शिंपी, कोणी मोची अशा कसबाचेहि होते. जर त्यांनी तुह्मा लोकांच्या मूर्ख समजुतीप्रमाणें आपल्या संसाराचे गाडे चालविण्यासच विद्येचा व ज्ञानाचा उपयोग केला असता, तर ते आज शेकडों वर्षें अमर राहिले नसते. लोकांस त्यांच्या नावाची आठवणहि कधीं न पडती.

वृ० गृ०— हें तुमचें बोलणें पुरुषांच्या विद्वत्तेविषयीं आहे. ते विद्वान होऊं नये असें माझें मत नाहीं. आपल्या देशांत जे विद्वान व ज्ञानी झाले, त्यामध्येंहि तुह्मी सांगतां त्याप्रमाणें कितीएक होते. पाहा, तुकाराम कवी वाणी होता आणि तसेच अणखी दुसरे.

न० वि०— खरी गोष्ट; जरी मी हें पुरुषाचें उदाहरण घेऊन बोललों, तरी हाच विचार स्त्रियांच्या विद्याभ्यासाकडे लावायास कांहीं दोष नाहीं. त्यांस "दारा बाहेरचें काम" करायाचें नाहीं ह्मणूनच त्यांस विद्येची विशेष गरज आहे. त्या घरांत राहूनच आपल्या ज्ञानाचा अधिक उपयोग करूं शकतील. आतां ह्यावर आपला काय अभिप्राय तो कळूं द्या.

वृ० गृ०— जरी मी तुमच्या बोलण्याप्रमाणें वर्त्तणुक करायास इच्छित नाहीं, तरी त्याच्या खरेपणाविषयीं माझा आतां संशय फिटला. परंतु अणखी माझ्या मनांत

शंका आहेत, त्यांचें उत्तर ऐकिल्याशिवाय मला आपलें मत प्रगट करावेंसें वाटत नाहीं.

न० वि०— जर आपण सत्य शोधण्याच्या हेतूने विचाराल तर मी यथामति उत्तर देईन; परंतु जर एखाद्या दुराग्रही, दाष्ट, व छांदिष्ट स्वभावाच्या मनुष्याप्रमाणें वितंडवाद घालूं लागाल, तर तुमची खातरी करून देणारा ही सर्व पृथ्वी धुंडिली असतांहि मिळणार नाहीं.

वृ० गृ०— (६) आपण मनुष्यें कितीहि विद्वान झालों व आपलें व्यवहारिक ज्ञान व विचार कितीहि चांगले असलें, तरी ते शास्त्रांतील नियम व आज्ञा यांस अनुसरून असले पाहिजेत, नाहीं तर त्यांच्या चांगलेपणाचा काय उपयोग? स्त्रियांस विद्या शिकवून सुशिक्षित करण्याचे विचार जरी चांगले आहेत, व तुह्मी ते प्रमाणपूर्वक गोष्टींनीं सिद्ध करूं शकतां, तरी ते शास्त्रविरुद्ध असल्यामुळें त्याज्य आहेत. आतां इतकेंच कीं आमच्या शास्त्रांत सहस्त्र ऋषींचीं मतें आहेत त्यांतून एखाद्याने कदाचित् तुमच्या विचारास अनुकुळ असें लिहिलें असलें तरी मुलींस विद्या शिकविण्याची चाल आमच्यामध्यें नाहीं व आमच्या वाडवडिलानींहि कधीं आपल्या कन्यांस शिकविलें नाहीं. मग आह्मीच नवी चाल कोठून व कशी काढावी. आणि तुह्मी तरी आपल्या वडिलांच्या परंपरागत चालत आलेल्या चालीवर कांहीं नजर ठेवून वर्तत जा. तुह्मासच आतां ज्ञानाचें व बुद्धीचें मूळ सांपडलें आहे असें नाहीं. तुमचे आजे पणजे आंधळे होते आणि तुह्मासच आतां ज्ञानचक्षू प्राप्त झाले आहेत कीं काय?

त० वि० (हा गृहस्थ आतां तापला आहे, असें मनांत समजून मृदु व नियम पूर्वक भाषणाने त्यास ह्मणतो) वडील बाबा आपण रागें भरूं नका माझ्या लेकराच्या गोष्टींत कांहीं चूक असल्यास आपण नीट करावी, असें मी आपणास प्रथमच सांगितलें आहे. आतां आपण शास्त्राची व चालीची गोष्ट काढली यावरून मला वाटतें कीं, आपणास माझ्या मताचा खरेपणा दिसून आला आहे. परंतु तें प्रवृत्तींत आणण्यास शास्त्र आणि चाल या दोन गोष्टींचाच मात्र प्रतिबंध आहेसा वाटतो आणि याच जर आपणास दुस्तर अडचणी वाटत असल्या, तर मी सांगतों तो विचार ऐकावा, ह्मणजे मार्ग मोकळा होईल. तुमचा ह्मणण्याचा भाव इतकाच कीं, स्त्रियांस विद्या शिकवायास शास्त्राज्ञा पाहिजे. कदाचित् हें खरें असलें तरी त्याची मोठी अडचण आहे, असें नाहीं. तुह्मी आपल्या मनास असा प्रश्न करा कीं, आह्मा हिंदु लोकांचें शास्त्र ह्मणजे काय? तें कोणी व केव्हां लिहिलें? मला वाटतें कीं, मनुष्यानी सदाचरणाने व नीतीने वागावें व दुष्ट चाली बंद होऊन लोकांस सुख प्राप्त व्हावें ह्मणून आपल्या देशच्या प्राचीन विद्वानाहीं कर्मनियमादिव्यवस्था ग्रंथीं लिहून ठेविली, तिलाच पुढें शास्त्र असी संज्ञा पडली असेल (आणि "शास्ति, तंत् शास्त्रं." असा शास्त्र शब्दाचा अर्थ आहे). त्या शास्त्रांत सर्व गोष्टी लिहिल्या आहेत, असें नाहीं. आणि ज्या लिहिल्या आहेत त्या सर्व सदोदित चालाव्या असें कोठें सांगितलें नाहीं. शास्त्र लिहिते वेळीं लोकांची जी स्थिती असेल तिला त्यांतील गोष्टी उपयोगी असतील. परंतु

आतांच्या लोकांची अवस्था फार वेगळी आहे. आणि त्यास शास्त्रांतील सर्व गोष्टी अनुकूळ पडायाजोग्या नाहींत. यास्तव बहुत प्रसंगीं शास्त्र एकीकडे ठेवून देशकालानुसार वर्त्तणूक केली पाहिजे. आणि सांप्रत तसाच प्रकार चालला आहे.

वृ० गृ०—होय, आतां फारच भ्रष्टाकार होत चालला आहे. धर्म बुडण्याची वेळ आली आहे.

न० वि०—असा निर्दोष व निष्पाप भ्रष्टाकार चालू झाला म्हणूनच आपल्या लोकांची कांहीं बरीगत आहे. नाहीं तर या काळांत हिंदुशास्त्राप्रमाणें चालूं लागलें तर फजीती होऊन उपाशी मरायाची पाळी आली असती. बाजीरावाच्या वेळेप्रमाणे, इंग्रजांचा स्पर्श झाला असतां पालख्या व म्यानेसुद्धां सचैल स्नान करायाचें शास्त्र जर या दिवसांत चालविलें असतें, तर लोकांस भीक मागावी लागती बरें तें असो. पण सांप्रत ब्राह्मणलोक शास्त्रविरुद्ध चाली किती चालवितात, त्यांकडे तरी लक्ष द्या. समुद्रांतून जाणें ब्राह्मणास निषिद्ध आहे; असें असतां हजारो ब्राह्मण द्वारका, रामेश्वर, गोकर्ण इत्यादि क्षेत्रीं, व सुरत, कच्छभुज, कराची, राजापूर, गोवें इत्यादि ठिकाणीं जाहजांत बसून कसे जातात, त्यांस कोणी जातिभ्रष्ट करीत नाहीत. दुसरें शास्त्रवर्ज कर्म ब्राह्मणानी शूद्राची चाकरी करूं नये, असें आहे, तथापि आतां तर म्लेच्छाची, यवनाची व माहाराची देखील करितात; त्यांस कोणी शब्द लावीत नाहीं. आणि असीं उदाहरणें हजारो मिळतील. सारांश अशा कामांत जर शास्त्र गुंढाळून

ठेवण्याचा दोष मानीत नाहींत, तर स्त्रियांस विद्या शि-
कवायासच शास्त्रनिषेध कां बाळगावा ?

दुसरें हें कीं तुह्मामध्यें पूर्वींपासून ही चाल नाहीं, ह्मणून कदाचित् प्रथम अवघड वाटेल; परंतु एक वेळ प्रवृत्ती पडल्यावर सर्व सोपें होईल. तुह्मी ह्मणतां कीं आमचे वाडवडील मूर्ख होते कीं काय ? त्यानी हा विचार शोधून काढला नाहीं. तर जरी ते शाहाणे होते, तरी त्रिकाळज्ञ व सर्वज्ञ नव्हतना. मग त्यांस हा विचार कोठून सुचेल ? मनुष्याची सुधारणा पृथ्वीच्या उत्पत्तिकाळींच झालीं असें नाहीं. शनैः शनैः होत आहे. परंतु यावरून आपल्या वडिलांस जरी दोष लागत नाहीं तरी जर आपण आतां असेच राहून वडिलांच्या चाली न सोडल्या तर मात्र आपण त्यांपेक्षां दुप्पट दोषी व मूर्ख आहों. वडिलांचे वेळीं आपल्या परसांतील विहिरीस लाकडांचा कठारा किंवा भिंत नव्हती आणि आतां जर ती नसल्यास घात व दगा होण्याचा संभव आहे, असें आपणास दिसून आलें, तर आपण नवा कठारा किंवा नवी भिंत बांधूं नये कीं काय ? आणि बांधिली असतां आपणास कोणी असें ह्मणेल कीं, "काय तुह्मासच आतां ज्ञानाचें व बुद्धीचें मूळ सांपडलें ? तुह्मासच काय आतां ज्ञानचक्षू प्राप्त झाले आहेत ? तुमचे आजे पणंजे आंधळे होते कीं काय ?" असें कोणी बोलणार नाहीं. तसेंच पूर्वी कोणाचे वडील एखाद्या दुर्व्यसनांत पैका उधळून भिकारी झाले ह्मणून त्यांच्या पुत्रानी हुशारीने व चांगल्यापणाने चालून द्रव्यसंचय करूं नये कीं काय ? आणि असे जे करितात

त्यांस आपण बोललां त्याप्रमाणें कोणी बोलत नाहीं. या गोष्टींत वडिलांची चाल मोडली तर दोष लागत नाहीं. अणखी असीं पुष्कळ उदाहरणें सांपडतील. आपला वंशपरंपरा चालत आलेला वडिलांचा धंदा सोडून हजारो लोक दुसरा उद्योग करीत आहेत, त्यांस कोणी शब्द लावीत नाहीं. असें असतां तुह्मासच या स्तुत्य चालीकरितां कोण नांव ठेवील? यावरून असें सिद्ध होतें कीं, स्त्रियांस विद्या शिकवूं नये ह्मणून तुह्मी वडिलांच्या चालीचें निमित्त दाखवितां, तें व्यर्थ आहे.

(हें बोलणें होत असतांना तिकडे त्या वृद्ध गृहस्थाचा उपाध्या बाहेरून येऊन तेथें बसला होता, तो हें भाषण ऐकून विद्वानास ह्मणतो.)

**उपाध्या.**— बरें, तर आह्मी शास्त्र व चाल एकीकडेस ठेवून आमच्या कन्यांस विद्या शिकविली, तर त्या लहान आहेत तोंपर्यंत उंदरामांजराच्या गोष्टीचीं बुकें वाचतील. पुढें एकदां त्या संसारास लागल्या ह्मणजे मग त्यांस त्यांचा काय उपयोग? त्यांस आपल्या उद्योगांत अवकाश कोठून मिळेल? तुमच्या मतें त्यानी खुरश्यावर बसून मडमांप्रमाणें बुकें वाचावीं, व त्यांच्या नवऱ्यानी चुलीजवळचें काम करावें कीं कांय? वाहवा! भली मसलत सांगतां, आणि ह्मणतां कीं ही तुमच्या हिताची गोष्ट आहे.

**वृ० गृ०**— उपाध्ये बावा, तुह्मास यांत कांहीं समजत नाहीं. तुह्मी कायतें पंचांग पाहून मुहूर्त सांगावा, व एखादें कर्म चालवून पडशी भरण्यापुर्ती मात्र गरज बाळगावी. जर तुह्मी हा आमचा वाद आरंभापासून श्रवण केला असता, तर असें भाषण न बोलतां. मला तर

आतां समजूं लागलें आहे कीं स्त्रियांस विद्येची गरज आहे.

गृ०— कशास ?

त० वि० पैका मिळविण्यास नव्हे; पण आपलें अज्ञान दूर करून ज्ञानाच्या योगानें ईश्वराची भक्ति व सेवा करायास.

गृ०— आमच्या स्त्रियांस इतक्या खटपटीची गरज नाहीं. स्त्रीला मुख्य दैवत तिचा पती होय. त्याची तिनें सर्वकाळ सेवा चाकरी करावी, ह्मणजे तिला सर्व धर्माचरणाचें श्रेय प्राप्त होतें. पद्मपुराणांत असें सांगितलें आहे कीं, "जेव्हां ती आपल्या नवऱ्याच्या दृष्टीसमोर असेल, तेव्हां तिनें आपलें सर्व लक्ष त्याजकडे लाविलें पाहिजे. तो जी आज्ञा करील, ती तत्क्षणीं मान्य केली पाहिजे. तो जेव्हां तिला हाक मारितो, तेव्हां तिनें सर्व कामें टाकून हाकेसरसें त्याजपाशीं गेलें पाहिजे. तिला नवऱ्याशिवाय दुसरा देव नाहीं, अनन्यभावानें त्याची तिनें आज्ञा मानून सेवा केली पाहिजे. जरी तिचा नवरा वृद्ध, अशक्त, रोगी, वेडा, व्यसनी आणि कसाहि असला, तरी तिनें त्यास देवाप्रमाणें मानिलें पाहिजे. त्याच्या अवलक्षणाचा व दुर्गुणाचा तिनें त्रास मानूं नये. त्याचें व्यंग पाहूं नये. तो जर हांसेल, तर तिनें हसावें, तो रडला तर तिनेंहि तसें करावें. तो उपाशी राहिला तर तिनें जेवूं नये. त्याच्या पूर्वींहि जेवूं नये. जो कोणता पदार्थ त्यास आवडत नाहीं, तो तिनें खाऊं नये. तो जर गावीं गेला असला, तर तिनें स्नान करूं नये. दांत घासूं नयेत; हात पायांचीं नखें काढूं नयेत; प्रति दिवशीं दोन वेळा जेवूं नये." याप्रमाणें त्यांस शास्त्राज्ञा असतां, त्यांनी

विद्या शिकावी व आपल्या पतीपेक्षां शाहाणें व्हावें, हें किती अधर्माचें कृत्य आहे ! स्त्रियांचे गुणाविषयीं स्कंद पुराणांत असें सांगितलें आहे कीं, त्यांच्या ठाईं, "अनृत्र साहस, मोह, मूर्खत्व, अतिलोभ, अशौच, निर्दयत्व," हे गुण सर्वदां वास करितात. अणखी असे कीं, तिने कधीं स्वतंत्र राहूं नये, असें शास्त्रांत सांगितलें असतां, तिला विद्या प्राप्त झाल्यावर मग तीं परस्वाधीन पतीच्या आज्ञेत कशी वागेल ? स्त्रीवर कधीं विश्वास ठेवूं नये. तिला आपलें गुज सांगूं नये, असें शास्त्र बोलतें. आणि तुह्मी ह्मणतां कीं, त्यांस विद्या शिकवावी, मग त्या आपल्या नवऱ्याचीं सर्व गुप्त कागदें पत्रें पाहणार नाहींत कीं काय? त्यांतील सर्व गोष्टी बाहेर फुटतील कीं नाहींत ! असो; याप्रमाणें स्त्रियांस विद्या अगदी निष्फळ व निरूपयोगी आहे. आपण इतका वेळ आमच्या यजमानास जें कांहीं सांगितलें असेल तें मी ऐकिलें असतें, तर आपणास त्या सर्व विषयाचें खोटेपण दाखविलें असतें. परंतु आतां अवकाश नाहीं, यास्तव मी आपणाबरावर बोलायास बसत नाहीं.

स० वि०— तुह्मी माझें उत्तर न ऐकतां जाल तर त्यांत तुमचाच पराजय झाल्याप्रमाणें होईल. आपणास फारच निकडीचें काम असलें, तर मी थोडक्यांतच उत्तर देतों, तेवढें ऐकून मार्गानें चालतांना त्याजवर आपला विचार चालवीत जावें, ह्मणजे आपण बोललेल्या सर्व गोष्टींचीं उत्तरें आपणासच सुचतील.

१ प्रथम, आपण जीं शास्त्रांतील वाक्यें प्रमाणास्तव सांगितलीं, तीं सर्व मनुष्यानी लिहिलीं आहेत. यावि-

षयीं त्यांतील अर्थच स्वतां साक्षी देतात. ईश्वर असी आज्ञा कदापी देणार नाहीं. त्यांत त्याच्या सर्व गुणास बट्टा लागतो.

२ स्त्रीला तिचा पतीच दैवत आहे, हें तुमचें प्रमाण ऐकून मुला तुमच्या अज्ञानाविषयीं दया येऊन दुःख वाटतें. अहो, ज्याने हें सकळ विश्व उत्पन्न केलें, त्याची योग्यता नीच व पामर जो मनुष्य त्यास देण्यास तुह्माला भय व लज्जा कसी वाटत नाहीं ? या तुमच्या अपराधाची तुह्मास मरणानंतर मोठी भयंकर शिक्षा प्राप्त होईल. मनुष्याची सेवा करून मनुष्यें तरतील तर ईश्वर कशास पाहिजे ? मनुष्यच देव झाल्यावर परमेश्वराची कोण भक्ति करील ? आणि जर प्रत्येक स्त्रीस तिचा नवरा देव आहे, तर या पृथ्वींत जेवढीं मनुष्यें आहेत, तेवढे देवच होतील. देवास रोग, दुःख, पीडा, दारिद्र, हानी, लज्जा इत्यादि प्राप्त होतात, असें तुमच्या मतावरून सिद्ध होतें. आणि हीं तुमचीं अघोरी मतें कोणत्या लोकांच्या धर्मास तरी मिळतात कीं काय ? आपल्या भरतखंडांत प्रख्यात असे ख्रिस्ती, महंमदी व पारशी इत्यादि धर्म आहेत. त्यांतील एकांत तरी असा सिद्धांत आहे कीं काय ? असे जे मतवादी आहेत, त्यांच्या विद्येस व ज्ञानास धिःकार असो. आणि त्यांजबराबर वादकरून तरी काय उपयोग ? ज्यांस ईश्वराचेंहि भय नाहीं ते मनुष्याच्या गोष्टी ऐकून कसे सुधरतील ?

वृ० गृ०– आपणास एथें धर्मसंबंधी विषयावर वाद करायाचा नाहीं. उपाध्ये बावा, तुह्मी मार्गस्थ व्हा. पुजा झाली तेवढीच पुरे. अधिक भाषण केल्यास मा-

हापूजा व उत्तरपूजाहि होईल. तुह्मी अशा गोष्टी जे देवभोळे व अज्ञानी लोक असतील, त्यांजपाशीं सांगाल तर तुह्मास पैसा दुगाणी मिळेल. एथें कांहीं डाळ शिजायाची नाहीं.

(तो उपाध्या निघून जातो.)

**त० वि०**– जर आपल्या सर्व शंकांचें समाधान झालें असेल, तर स्त्रियांस विद्या शिकविण्याचीं मुख्य कारणें व त्यांस सुशिक्षित केल्याने कोण कोणते लाभ होतील, त्यांविषयीं कांहीं संवाद चालवावा, असी माझी इच्छा आहे.

**वृ० गृ०**– (७) मला आतां समजूं लागलें कीं, आमच्या स्त्रिया विद्या शिकल्या असतां त्यांजवर इंग्रज लोकानी जो 'अज्ञान' असा दोषारोप ठेवून सर्वत्र गवगवा केला आहे, तो नाहींसा होईल, व त्या स्वतांहि आपल्या रिकामपणाच्या वेळीं चांगलीं पुस्तकें वाचून ज्ञानप्राप्ति करून घेतील. परंतु त्यानी विशेष ज्ञानी होऊन पुरुषांची बरोबरी करावी, हें मला ठीक दिसत नाहीं. दुसरा विचार असा उत्पन्न होतो कीं, ज्या पुरुषानी आमचें शास्त्र लिहिलें, त्यानी स्त्रियांस इतक्या नीच स्थितींत ठेवावें, असें लिहिण्याचें काय कारण असावें बरें? पाहा, मघा आमच्या उपाध्याने जें शास्त्रांतलि स्त्रियांचें वर्णन करून दाखविलें, तें किती दुःखप्रद होतें!

**त० वि०**– इतका वेळ जें आपलें संभाषण झालें त्यापासून एवढें फळ निष्पन्न झालेंसें पाहून मला थोडासा आनंद प्राप्त झाला आहे. स्त्रियांस विद्या शिकविली असतां सुधारलेले जे इंग्रज इत्यादि लोक, यांत जो त्यां-

च्या अज्ञानत्वाविषयीं गवगवा झाला आहे, तो नाहींसा होईल, या निमित्तानें तरी त्यांची सुधारणूक करावी, असें आपल्या मनांत वागूं लागलें हें पाहून मी या वेळीं मोठा भाग्यवान आहें, असें समजतों. ईश्वर करो, आणि या विचाराचें बीज आपल्या मनांत उगवून त्याचा मोठा विस्तृत वृक्ष होवो; व त्यांस स्त्रियांच्या सुशिक्षेचीं पक्कीं व सुरस असीं फळें येवोत. आतां आपण घेतलेल्या दोन शंकांचे समाधानार्थ कांहीं बोलतों.

वृ० गृ०—म्याहि आतां तसाच निश्चय केला आहे, व जें सयुक्तिक आणि उपयुक्त दिसेल, तेंच ग्रहण करावें. आपणहि मजजवळ बोलण्याचा संकोच ठेऊं नये.

त० वि०—जें सत्य आहे, तें बोलण्यास कोणाची भीड मर्यादा कशास धरावी ? सर्व प्रसंगीं व सर्व ठिकाणीं सत्यास जयच आहे. जरी एखादे वेळीं मनुष्यास सत्याची परीक्षा होत नाहीं, तरी सर्वांचें अंतःकरण जाणणारा जो ईश्वर त्याला सर्व उघड आहे.

आपण ह्मणतां कीं स्त्रीनें पुरुषाची बरोबरी करावी हें ठीक दिसत नाहीं. तर बहुत काळापासून जी चाल चालत आली आहे ती मोडून नवी करायास अवघड वाटतें. परंतु जसें औषध घेतलें ह्मणजे आंबट तिखट इत्यादि कुपथ्याचे पदार्थ सोडिले पाहिजेत, तसें सत्य ग्रहण केल्यावर अज्ञानाची चाल कितीहि जुनी व आवडती असली, तरी सोडली पाहिजे. आह्मा हिंदूंच्या स्त्रिया बहुतकाळापासून दासपणांत आहेत त्यांस बरोबरीची पदवी देण्यास त्यांच्या नवऱ्यांस अवघड वाटेल, हें खरें. परंतु त्यांनीं असा विचार करावा कीं, आपण

आपल्या मित्रांस मान दिल्हा ह्मणून त्यांत आपणास काय लहानपण येतें? आपली स्त्री आपली दासी आहे? किंवा आ- आपण तिला विक्रीत गुलामाप्रमाणें आपल्या घरीं आणिली आहे? तसी जर ती असती, तर मात्र तिला आपल्या बरोबर मानणें हें अयोग्य दिसतें. परंतु ती परमेश्वराने व आप- ल्या आईबापानी आपणास आपली सोबतीण व सुख- दुःखाची वाटेकरीण होण्यासाठीं दिल्ही आहे. अणखी असें कीं पदार्थाचें वास्तवीक मोल समजल्यावर मग त्यास त्याच्या योग्यतेनुसार मान देण्यास काय चिंता आहे ? तसेंच स्त्रियांस पुरूषांपेक्षां नीच मानण्याचीं काय कारणें आहेत बरें ! त्यांचा अपमान आपण कां करावा ! सर्व स्त्रिया जरी अशिक्षित असल्या तरी दुर्गुणी आहेत असें नाहीं; स्त्रीची जात ईश्वरें पाहा कसी केली आहे ! ती भली, प्रमाणिक, भिडस्त, मर्यादशील, गरीब चपळ- बुद्धीची असी आहे. नवऱ्यापेक्षां स्त्रीची प्रीती त्याजवर फार असती. कित्येक स्त्रियानी नवऱ्याकरितां आपले प्रा- णहि खर्च केले आहेत; हे तिचे स्वाभावीक गूण आहेत. त्यांत अणखी तिला विद्या व शिक्षा प्राप्त झाली ह्मणजे "अगोदर सोन्याचें त्यावर जडावाचें" याप्रमाणें त्या वि- शेष गुणवती व सुज्ञ होतील. भगवंताने आपणास स्त्री दिल्ही आहे ह्मणून किती सुख आहे बरें! स्त्री आहे ह्मणू- नच सर्व संसार चालतो, कुटुंब वृद्धिंगत होतें, देश- वृद्धि होती, व मनुष्याचीं सुखेंहि वाढतात. पाहा, कुटुंब- वत्सल पुरूषाची बायको मरती त्यास किती विपत्ति व हाल भोगावे लागतात. त्याचीं मुलें उघडीं पडतात. त्याचा संसार अस्ताव्यस्त होतो. त्याचें घर शून्यवत

भासतें. हाय हाय! त्या बिचाऱ्याचीं मुलें जेव्हां आईच्या नांवाने करूणास्वर काढितात, तेव्हां त्याचें व सर्व घरांतील माणसांचें दुःखाने अंतःकरण वितळून जातें. त्या वेळीं त्याला ईश्वर आठवतो. आणि तो ह्मणतो कीं देवा! काय हा मजवर गहजब केलास. मला कां मरण दिल्हें नाहींस! पाहा, हीं तान्हीं बाळें माउलीच्या पंखाशिवाय कशीं उघडीं पडलीं आहेत. ईश्वरा, तूं आतां यांचें रक्षण कर; असा तो दीन वाणीने परमेश्वराची प्रार्थना करितो. आणि त्यास तशा प्रसंगीं स्त्रीचा किती उपयोग व गरज आहे, हें पूर्तेपणीं समजतें.

वृ० गृ०—आतां माझ्या दुसऱ्या प्रश्नाचें कृपा करून उत्तर द्यावें.

त० वि०—आपल्या दुसऱ्या प्रश्नाचें वास्तवीक उत्तर माझ्याने देववेल असें मला वाटत नाहीं. कारण, त्यांतील विषय काल्पनीक आहे. आणि मी तर्काने एखादें उत्तर देईन, तें लागूं पडणार नाहीं. परंतु माझ्या बुद्धीस जे वाटतें तें सांगतों.

मला याचें कारण इतकेंच वाटतें कीं ज्या ग्रंथकर्त्यांनी स्त्रियांची निंदा लिहिली असेल, त्यांस त्यांच्या वेळीं बहुत अज्ञान स्त्रियांचा प्रसंग पडला असेल, व त्यांपासून कदाचित् त्रासहि पोहंचला असेल. आणि तेवढ्या कारणावरून त्यानी सर्व स्त्रिया पापरूपीच आहेत असें लिहिलें असावें. पण हें करणें त्यांस योग्य नव्हतें. असो, आतां आपणहि त्यांप्रमाणें मूर्ख समजुती धरून बसूं नये, कारण उत्तरोत्तर पृथ्वींतील मनुष्यें सुधारत चाललीं आहेत; त्यांच्या अंधपरंपरागत चालत आलेल्या गैरसमजुती लयास जाऊं

ते आतां नवीन मार्ग स्थापूं लागले आहेत. आणि जर आपण आपल्या पूर्व स्थितींतच राहूं, तर त्यांत आपली मोठी हानी व अप्रतिष्ठा आहे. यास्तव आपण झटून उद्योग करून आपल्या देशांत ज्ञानाची, विद्येची, व संपत्तीची वृद्धि केली पाहिजे. परंतु जोंपर्यंत आपले लोक स्त्रियांस जनावराप्रमाणें मानून अज्ञानांत ठेवितील, तोंपर्यंत ही आशा बाळगणें व्यर्थ आहे. (हें बोलणे होत आहे इतक्यांत दारासीं चार घोड्यांचा रथ तयार होऊन आला व गाडीवान वर येऊन ह्मणतो, महाराज! बाहेर फिरायास जाण्याची वेळ झाली दरवाज्यापासीं रथ उभा आहे. मग त्या यजमानाने आपल्या पाहुण्यास विनंती केली कीं, बाहेर मैदानांत गारापिराकडे चांगली रमणीय हवा घेण्यास चलावें त्यांजबराबर शिवराम व भागीरथी हीं पोशाक करून आलीं त्यांसहवर्तमान ते सर्व बाहेर गेलीं मार्गांतून जातांना तो तरूण विद्वान आपल्यासीं बोलतो.)

ईश्वरें आज सुदिन दाखविला. या वृद्ध गृहस्थाचे मनांत स्त्रियांच्या सुधरणुकेविषयीं वागूं लागलें, हा कांहीं सामान्य लाभ नव्हे. यासारिख्या प्रतिष्ठित, द्रव्यवान् व संभावीत मनुष्याने मनावर घेऊन या कामास हात घातला आणि चौघांत आपलें वजन खर्चिलें, तर आह्मासारिख्या पंचवीस जणानी हट्टी लोकांबराबर महिनाभर वाद करून जें निष्पन्न होणार तें हा क्षणांत करील. आजच्या संवादापासून त्याच्या सर्व मूर्ख समजुती व शंका यांचें बरेंच खंडण व समाधान झालेंसें वाटतें. आतां उद्या पुनः याच विषयावर भाषण करून स्त्रियांस विद्या

शिकविण्याचीं कारणें व त्यापासून कोणते लाभ होतील, ते त्यास समजावून सांगावें नंतर भागिर्थीस आपल्या बरोबर नेण्याची गोष्ट काढावी.

---

## संभाषण २.

दुसरें दिवशीं भोजनोत्तर पुनः त्या तरुण विद्वानानें आपलें संभाषण त्या ग्रहस्थाबरोबर चालू केलें.

**त० वि०**— महाराज, काल आपलें जें भाषण झालें त्यावरून आपणास स्त्रियांच्या स्थितीविषयीं कसें वाटतें? मला तर त्यांची दशा पाहून फार कळवळा येतो. पण काय करावें! जर आपणांसारिख्या थोर नामांकित संभावीत गृहस्थांनीं मनावर घेऊन या गोष्टीची गरज आहे असें लोकांस कळविलें नाहीं, तर आह्मा गरिबांनी किती बोलावें बरें! आपण क्षणांत जें कराल तें आमच्याने साऱ्या दिवसांतहि होणार नाहीं. असो, सत्याच्या पक्षास ईश्वर असला पुरे, मग तो कोणत्याहि उपायाने आपलें कार्य सिद्धीस नेतो.

**वृ० गृ०**— तुह्मी बोलतां तें म्या मान्य केलें. पण मला आपल्या लोकांत ही गोष्ट काढायास अझून थोडीसी अडचण आहे. आपण काल ज्या प्रकारें माझ्या शंकाचें समाधान केलें तसें मीहि आतां त्यांचें करीन. पण मला असें वाटतें कीं, स्त्रियानी विद्या शिकण्याबद्दल पुरुषानीच चांगला अभ्यास करून शाहणें व्हावें व आपला

देश सुधारावा. ते सुशिक्षित झाले ह्मणजे त्यांच्या हाता-खालीं त्यांच्या स्त्रिया नीट वागतील. पाहा बरें! गावांत सर्व लोक विद्वान असतात कीं काय? व्यापारी, उदमी, कसबी, हे सर्व कोठें विद्या शिकलेले आहेत? पण ते आपापलीं कामें विद्वानापेक्षांहि चांगली कुशळतेने व अकलहुशारीने चालवितात. विद्वानाचीं कामें चालवाया पुर्ते दोन चार शास्त्री पंडीत वैदीक असले ह्मणजे ते पडल्या गोष्टीचा निर्णय करितात. सर्वांसच धर्मशास्त्र शिकण्याची गरज लागत नाहीं. तसेंच आपल्या स्त्रिया गृहकृत्याच्या कामांत मोठ्या हुशार व दक्ष आहेत. त्यांस विद्याच शिकवावी असें कांहीं कारण व त्यापासून त्यांस कोणते लाभ होतील, ते माझ्या लक्षांत येत नाहींत.

त०वि०—या आपल्या बोलण्यावरून मला असें वाटतें कीं, विद्येपासून जे लाभ व संतोष प्राप्त होतात त्यांचा अद्याप आपणास अनुभव नाहीं. आपापलें कसब किंवा उद्योग करितां आला ह्मणजे विद्येची गरज नाहीं; असें समजूं नये. अगदी गरीब जे हेल मजूरी करून पोट भरितात, त्यांसहि विद्येपासून लाभ व संतोष प्राप्त होतील, यांत संशय नाहीं. व्यापारी व उदमी यांस जर त्यांच्या अभ्यासी वयांत चांगली विद्या व शिक्षा प्राप्त होईल तरच ते पुढें आपापल्या उद्योगांत सचोटीने वागतील. गरिबावर दया करितील, लोकांचें कल्याण इच्छितील व आपल्या मनास दुर्व्यसनाची व्यथा न होऊं देतां निर्दोष व आनंदकारक असें जें विद्येचें व ईश्वरसेवेचें व्यसन, तें लावून घेतील. तुह्मी पाहा कीं, जे अशिक्षित हिंदुलोक सांप्रत

सरकारच्या कामावर आहेत, त्यांतून किती दुर्गुणी, व्यसनी, द्वाड, वृथाभिमानी, लांचखाऊ आहेत बरें? त्यांचा रिकामपणाचा वेळ कसा जातो ? त्यांस पुस्तकें वाचण्याचा त्रास येतो; विद्येचे विषय त्यांस ओकारी सारिखे वाटतात; ते आळसास सुख मानून, रिकाम्या गप्पा झोकित बसतील; पण एखादें वर्तमानपत्रही वाचणार नाहींत. व्यर्थ डौल करण्यास मात्र हुशार असतात थोडासा अधिकार व द्रव्य प्राप्त झालें ह्मणजे त्यांस उन्माद चढतो ते ज्या ठिकाणीं कामावर असतात तेथें कोणी मनुष्य कामाकरितां गेला तर त्यांच्या मनांत मोठा गर्व उत्पन्न होतो. तो मनुष्य त्यांच्या खातरेंतहि नसतो; त्याजपासून जर पान सुपारी मिळेल तरच ते त्याचें काम करून देतील. नाहीं तर त्याने पंधरा दिवस धक्के खाल्ले तरी दाद लागायाची नाहीं. कदाचित तुह्मी ह्मणाल कीं, याप्रमाणें ते परदेशस्थाकडेस वागत असतील. तर असें समजूं नका. एखादा टोपकर त्याजवळ आला, तर त्याच्या पायासीं कुत्र्याप्रमाणें वळघतील. पण गरीब बिचारे जे त्याचे स्वदेशीय बंधुजन त्यांसींच ते असी वर्त्तणूक करितात, हें पाहून मला फार दुःख वाटतें. आणि जेव्हां मी याजविषयीं विचार करितों तेव्हां त्याचें कारण मला असें दिसून येतें कीं, बाळपणीं त्यांच्या आईबापांपासून व गुरुपासून त्यांस चांगली विद्या व शिक्षा न मिळाल्यामुळें त्यांच्या ठाईं सत्य, प्रमाणिकपणा, निर्लोभ स्वदेशप्रीति, एकोपा, परोपकारबुद्धि, हीं नसतात. ते केवळ आपल्या पोटावर नजर देऊन वागतात. असो, हा विचार आपल्या विषयापासून फार निराळा आहे, ह्मणून

मी सारांश इतकाच सांगतो कीं, विद्येशिवाय मनुष्याचें जिणें व्यर्थ आहे. आणि जर पुरुषास तिची इतकी गरज आहे, तर स्त्रियांस त्यांपेक्षां किती अधिक असावी बरें? जे कोणी स्त्रियांस विद्या नको ह्मणतात, ते मनुष्य जातीसच नको ह्मणतात, यास्तव स्त्रियांस विद्या अवश्य शिकविली पाहिजे. तिजपासून त्यांस जे लाभ प्राप्त होतील ते सर्व कोण सांगूं शकेल? आणि त्याचें फळ एकासच प्राप्त होईल असें नाहीं, तर सर्व देशाची सुधारणा होण्यास त्यांची विद्या व ज्ञान कारण होईल.

वृ० गृ०—बरें, तर स्त्रियांस विद्या शिकविण्याचीं कारणें व विद्येपासून त्यांस लाभ, त्याविषयीं आज आपण कांहीं भाषण करूं, आतां पहिलें कारण आपणास कोणतें दिसतें तें सांगावें.

त० वि०—पहिलें कारण असें आहे कीं, आपल्या हिंदुलोकांच्या स्त्रिया सांप्रत अति अज्ञानावस्थेंत आहेत, त्यांची बुद्धि व ज्ञान पाहूं गेलें असतां पशूंपेक्षां विशेष नाहीं; तर या अशा प्रकारच्या नीच व लाजिरवाण्या स्थितींतून त्यांस बाहेर पडण्याचें मोठें अगत्य आहे. त्यांच्या नव्या स्थितीपासून त्यांस अप्रतिम लाभ होईल. जन्मांध पुरुषास नेत्रप्राप्तीवरून जो महदानंद होतो, त्याप्रमाणें जन्मापासून अज्ञानांध ज्या स्त्रिया त्यांस विद्या व ज्ञान हे दोन चक्षू प्राप्त झाले ह्मणजे त्यांचीं मनें व बुद्धि यांत सशिक्षा रूप सूर्याचा प्रकाश पडून त्यांत ईश्वरें कोणकोणतीं अमोल्य रत्नें ठेविलीं आहेत, तीं त्यांस दिसतील. आणि त्यांच्या अंतःकरणरूप घरांत अज्ञानांधकारामुळें कोण कोणत्या क्रूर, दुष्ट, व अमंगळ जीव

जंतूनीं वास केला आहे, हें त्यांस दिसूं लागेल, व त्यांचा त्रास व भय वाटून ते सर्व बाहेर काढून टाकण्याचा प्रयत्न करितील. जो मुळींच अज्ञान आहे, त्यास मात्र ज्ञानापासून कोणते लाभ होतील हें समजत नाहीं, व त्यास समजाविणेंहि अवघड आहे. तसेंच स्त्रियांसहि आपल्या अवस्थेचीं लक्षणें अज्ञानांत राहून समजायाचीं नाहींत; त्यांनीं स्वतां अभ्यास करून अनुभव घेतला पाहिजे.

त्या विद्या शिकल्या ह्मणजे त्यांस घरांतील व्यवहारपुरतेंच ज्ञान प्राप्त होईल असें नाहीं; तर सांप्रत ज्या दास्यत्वांत त्या आहेत, त्यापासून मोकळ्या होतील. त्यांच्या आंगीं प्रौढता, नम्रता, सन्मान्यता, हे सद्गुण येतील, त्यांच्या मनास विद्येचा व्यासंग लागला ह्मणजे त्या जो आपला फुरसुतीचा वेळ निजण्यांत, आळसांत, वेणीफणींची चाकपाकी करण्यांत, काहण्या सांगण्यांत, किंवा लोकांच्या घरची कुळकुट काढून कोणाची निंदा, कोणाचें गृहछिद्र उघडें करण्यांत घालवितात, तो सुंदर, मनोरंजक, बोधकारक व उपयुक्त अशा विद्येच्या विषयाचें अभ्यासांत खर्चतील; कारण विद्येच्या अभ्यासांत आपला काळ घालविणें, ज्या सत्यता दुसऱ्यानीं काढल्या आहेत त्या जाणणें आणि मनुष्यज्ञानाची मर्यादा वाढविणें, हा अतिशय श्लाघ्य आणि संतोषकारक उद्योग आहे."

तुह्मी ह्मणाल कीं, आपल्या स्त्रियांस घरच्या संसारखटल्यांत विद्येची गोडी घेण्यास वेळ कोठून मिळेल? तर ही मोठी अडचण आहे असें नाहीं. मुलगी तेरा चौ-

दा वर्षांची होईपर्यंत शाळेंत अभ्यास करील. तेथें शिक्षक स्त्रीच असली ह्मणजे तिने अणखी दोन चार वर्षें जास्त अभ्यास केला तरी कांहीं चिंता नाहीं. नंतर ती आपल्या संसारास लागल्यावर तिला दिवसाचें काम आटोपून विश्रांती घेण्यास अगदीच वेळ मिळत नाहीं, असें नाहीं; पुष्कळ वेळ मिळतो तेव्हां तिने आपल्या मनास शिक्षा करण्यांत व विद्येचे निरनिराळे विषय पाहण्यांत उद्युक्त असावें. श्रीमान गृहस्थांच्या स्त्रियांस तर सर्व काळ विश्रांतीच असती, मग त्यांस कशाची अडचण आहे ? त्यानी सर्वदा इंद्रियाचे नीच भोग भोगण्यापेक्षां प्रतिष्ठा व सुख देणारा जो विद्येचा विलास तो अवश्य भोगावा. सारांश इतकाच कीं सांप्रत आपल्या स्त्रियांस जी अज्ञानाची गाढ निद्रा लागली आहे, तींतून जागृत करण्यास त्यांच्या जवळ विद्यारूप घंटा वाजविली पाहिजे, ह्मणजे त्या सावध होतील.

वृ० गृ०— याशिवाय अणखी दुसरा कोणता उपयोग त्यांस होईल बरें ?

त० वि० (२) स्त्रियांस विद्या शिकविली असतां त्या स्वता सुधरतील इतकेंच नव्हे, तर त्यांस विद्येच्या अवश्यकतेचें दुसरें एक कारण आहे तें असें कीं मुलगा जर आईजवळ लिहिणें वाचणें शिकला, तर त्यास पुढें फार सोपें पडेल. पाहा लहानपणीं मुलास शाळेंत पाठविण्यास त्याच्या आईबापांस किती श्रम पडतात. त्यास पंतोजी ह्मटला ह्मणजे कोणी काळरूपी भयंकर पुरुष आहे, असें वाटतें. शाळेचें नाव घेतलें ह्मणजे तो लागलाच रडूं लागतो. शाळेंत गेला तर दोन तीन महिने ओनामा

घोकीत बसतो. त्याचें शिकणें ह्मणून कांहीं होत नाहीं; दररोज शाळेंत जातांना त्याचे रडूं असतेंच. आईकडून कांहीं खाऊ किंवा खेळणें घेण्याची कबुलात केल्याशिवाय तो पायरीखालीं पाय टाकितच नाहीं. तिजजवळ कांहीं जरी नसलें तरी मला लवकर बोलावायास पाठीव, इतकें वचन घेऊन मग तो ओटीखालीं उतरतो. याप्रमाणें बहुत मुलें नेहमीं शाळेंत न जाण्याकरितां रडून ओरडून अटाहास करितात. आणि या गुणानें पुढें त्यास सर्व कामांत हट्टी व छांदिष्ट होण्याची सवयी पडती. तर हें सर्व बंद करण्याचें सोपे उपाय असतां आपल्या पोरांचा दररोज जीव कां बेजार करावा? त्यांस मार बसण्याची धास्ती व भय न घालतां घरांतच त्याला गोडीनें व त्याच्या मर्जीप्रमाणें विद्येच्या मार्गास लावायास काय खर्च पडेल? त्याची आई स्वतां विद्वान व बुद्धिवंत असली ह्मणजे ती हें काम सहज करील. जर एखाद्या कुटुंबांत मुलें पुष्कळ आहेत, व त्यांच्या आईबांपास पैका खर्चून मुलांस विद्या शिकविण्याचें सामर्थ्य नाहीं, व बाहेरच्या कामामुळें स्वतां शिकविण्यास बनत नाहीं, तर मुलांची आई तें काम करण्यास शक्तिमान असल्यास किती हित होईल? ती त्यांस किती सुलभ व सोप्या रीतीनें शिकवील बरें? पंतोजीजवळ बसण्यापेक्षां तिजपाशीं तीं मोठ्या हौसेनें बसतील, व तीहि त्यांस सुंदर व चांगल्या बोधाच्या गोष्टी सांगेल; चित्रें दाखवील, त्यांचा अर्थ, उपयोग, व त्यांपासून कोणता उपदेश घ्यावा इत्यादि सांगून अनेकप्रकारें त्यांस विद्या अभ्यास आवडता व गोड करील.

जे सुधारलेले देश आहेत तेथील विद्वान व ज्ञानी

पुरुषांचा बाळपणींचा वृत्तांत वाचला असतां असें समजतें कीं त्यांचे मोठ्यापणांतील सन्मान्यतेविषयीं व प्रतिष्ठितपणाविषयीं ते आपल्या आईचे मोठे ऋणी होते. तर हा लाभ आपल्या लोकांस स्त्रिया विद्वान झाल्यावांचून कसा प्राप्त होईल?

लहानपणांत मुलाचें संघट्टण त्याच्या आईजवळ फार असतें व ती जसें त्यास वर्तन करून दाखवील त्याप्रमाणें तें चालतें. आपल्या स्त्रिया अशिक्षित आहेत ह्मणून त्या आपले मुलांसहि लाहानपणापासून आपल्याप्रमाणेंच दुर्गुण शिकवितात. आपल्या देशांत ज्येष्ठ पुत्राची आई ह्मटली ह्मणजे बहुतकरून अठरा किंवा वीस वर्षांच्या वयाची मुलगी असती. तिजजवळ तें मूल जनावरांच्या वचड्याप्रमाणें शरिरानें मात्र वाढतें. तें कांहींसें जाणतें ह्मणजे दोन किंवा अडीच वर्षाचें झालें नाहीं तों त्यास हात उचलावयास, कोणास छिः थुः करायास, लात मारायास, ती शिकविती. ही काय त्या लहान बाळकास सुशिक्षा ह्मणावी! त्याच्या कोमल अंतःकरणावर अशा प्रकारचा ठसा उठला ह्मणजे मग मोठेपणीं तो स्पष्ट दिसूं लागतो. परंतु हा तर त्याचा केवळ आरंभच जाणावा. अणखी त्या मुलास आपल्या आईपासून जे दुर्गुण प्राप्त होतात ते निराळेच आहेत. जसजसें तें वाढूं लागतें तसतसें वाईट व बिभत्स शब्द, शिव्या, रागाचीं भाषणें त्याच्या कानीं पडूं लागतात. खोटें बोलणें, हट्ट करणें, चाहड्या सांगणें, लोकांचा द्वेष व हेवा करणें, व कधीं कधीं चोरी करणें इत्यादि गुण त्यास आईपासूनच प्राप्त होतात. या प्रकारें आपल्या अज्ञान बायका मुलांस दुर्गुण

लावण्यास कारण होतात इतकेंच नाहीं, तर त्यांच्या मनांत खोट्या व व्यर्थ भयाच्या गोष्टी ठसवून देणाऱ्या होतात. मुलांस लहानपणीं राक्षसाच्या व भूतांच्या लांब लांब गोष्टी सांगून त्यांच्या मनांत भीति उत्पन्न करितात. बावा आला असें त्यांस भय दाखवितात. पण हींच भयें पुढें त्यांच्या दुर्दैवास कारण होतात.

या कारणास्तव आई सुशिक्षित झाली ह्मणजे तिचीं मुलें सहजच चांगलीं निपजतील. ईश्वराचें भय बाळगणें, सर्वांवर प्रीति करणें, आईबापांचा मान राखणें, गरिबावर दया करणें व सदाचरणाने चालणें, इत्यादि गोष्टी ती त्यांस शिकवील व स्वतां आचरण करून दाखवील, ह्मणजे किती बरें होईल! आज भरतखंडांत लक्षावधी मुलें अज्ञानांत व दुर्गुणांत वाढत आहेत. तीं सर्व ज्ञानाच्या उजेडांत येऊन सद्गुणी होतील, व तेणेकरून देशाची लवकरच सुधारणूक होईल.

वृ० गृ०— मी हें आपलें भाषण चित्त देऊन ऐकिलें. आणि माझी असी खातरी झाली कीं, यांत फार सूक्ष्म विचार आहे. मनुष्याच्या जन्मांतील गोष्टीकडेस दुरवर लक्ष देऊन आपण मला हें सांगितलें, आणि तें खरेंच आहे. मनुष्याचें थोरपण, मान व प्रतिष्ठा हीं त्याच्या विद्येवरच आहेत असें केवळ नाहीं. तर त्याचें सदाचरण व सद्गुण यांवरून तो मोठेपण पावतो. तर त्यांविषयीं लहानपणापासून त्यांस जपलें पाहिजे. जसा माळी आपलें फुलझाड लहान असतें तेव्हांपासून मोठ्या जतनेने वाढवितो, त्यास अतिशय उष्णता किंवा वारा, किडी, सुतेरे, गुरें ढोरें इत्यादिकापासून निर्भय ठेवितो,

ह्मणून त्यास पुढें चांगलीं उत्तम व मोलवान फळें येतात, तसीच मनुष्याची अवस्था आहे. त्यांच्या शरिराचीच काळजी वागवावी इतकें नाहीं, तर त्यांच्या मनांतील सद्गुण वाढविण्याचीहि काळजी बाळगिली पाहिजे. त्यांस बाळपणीं आईकडून चांगलें आचरण लागलें पाहिजे. आतां स्त्रियांस विद्या शिकविण्याचें तिसरें कारण असलें तर कृपाकरून सांगावें. मी आपणास फार श्रम देऊं इच्छित नाहीं; पण आपणाकडून ऐकावें ही माझी मोठी इच्छा आहे ह्मणूनः–

त० वि०– आपली जिज्ञासा यथामति करून तृप्त करण्यास मी सिद्ध आहें, व आपणास माझ्या बोलण्यांत रहस्य आहे असें दिसून आलेंसें पाहून मला फार संतोष वाटतो. (३) आपण तिसरें कारण विचारिलें तें सांगतों. आपल्या हिंदूच्या कुटुंबांत कित्येक गोष्टीविषयीं फार अव्यवस्था आहे, त्या गोष्टी अवश्य सुधारल्या पाहिजेत. आणि तसें करायास प्रथम आपल्या स्त्रिया शाहण्या विचारशील, बुद्धिवंत झाल्या पाहिजेत. पहिली गोष्ट असी आहे कीं, आह्मा हिंदुलोकांच्या कुटुंबांत शांती व समाधानसुख नाहीं. सर्व मनुष्यें एकमेकावर प्रीति करितात, व परस्परांचें हित पाहतात, व बरें इच्छून एकोप्याने राहतात, असें कुटुंब आपल्या लोकांत मिळणें फार दुर्लभ आहे. जिकडे पाहावें तिकडे परस्परांत द्वेष, वैर, हेवा, स्वार्थबुद्धि, सूड घेण्याची इच्छा, कपट, हे भाव दृष्टीस पडतात. याचें कारण पाहूं गेलें असतां बहुतकरून स्त्रियांचें मूर्खत्व व अज्ञान आहे.

दुसरी गोष्ट असी आहे की आपले लोक, स्त्रियांस

अतिशयच नीचावस्थेत ठेवितात. जीं जड व मेहनतीचीं कामें, तीं त्यांजकडे सोंपितात, त्यांच्या अशक्तपणाकडे लक्ष देत नाहींत. त्यांस वाटतें कीं ईश्वराने स्त्री हें एक आपणास दोन पायांचें व बोलतें जनावरच कष्ट मसालत करण्यास दिल्हें आहे. कुटुंबांत स्त्रीपुरुष व मुलें अशीं माणसें एकत्र बसून भोजन करितात व त्यासमयीं प्रत्येक जण किंवा त्यांतील मुख्य मोठाले अकलेचे विषय आणि शाहणपणाचीं भाषणें काढून सर्वांस शिकवितो, असें हिंदूंच्या कुटुंबांत तर मी कोठें पाहिलें नाहीं. बिचारे घरांतील स्त्रीने दासीप्रमाणें वागावें, असी लोकांची मूर्ख समजूत पडून गेली आहे; या कारणामुळें कुटुंबाच्या सुखापासून जो लाभ प्राप्त होतो, तो भोगण्याचें त्याच्या दैवीं नाहीं. स्त्रीपासून अपराध घडला असतां कित्येक लोक तिला जनावराप्रमाणें मारतात, व तोंडाने अभद्र व अमंगळ शब्द उच्चारून तिचें पातिव्रत्य भग्न करितात, तेणेकरून तिची मर्यादा राहत नाहीं; तिला कुटुंबाचा त्रास येतो. बहुतेकांस माहित आहे कीं नवऱ्याने अतिशय मारल्यामुळें कित्येक बायकानी जीव दिल्हे आहेत व कित्येकानी रागाने आपल्या बाळकांचा वध केला आहे, कित्येक घर दार सोडून गेल्या आहेत.

वृ० गृ०— होय, आणि अशा गोष्टी केवळ कुळंबी, माळी इत्यादि नीच वर्णांतच घडतात असें नाहीं, तर आपल्या ब्राह्मणवर्गांतहि मोठ्या मोठ्याच्या घरीं झाल्या आहेत.

त० वि०— ह्मणूनच हे अनर्थ बंद करण्याकरितां स्त्री व पुरुष उभयतां सुशिक्षित झालीं पाहिजेत; ह्मणजे

तीं आपापली योग्यता जाणून एकमेकांची प्रतिष्ठा राखतील, प्रीतीनें वागतील.

तिसरी गोष्ट असी आहे कीं, आपले पुरुष या अज्ञान बायकांचे मतास मिळून कुटुंबांत फार नाश करितात. कुटुंबांत वडील पुत्र कर्ता झाला ह्मणजे त्यास त्याची बायको जसी वागवील तसा तो वागतो. आपल्या बापास किंवा आईसहि तो मानीनासा होऊन त्यांस फार त्रास देतो, व जसें बायको सांगेल, तसें तो करितो. किंवा आणखी एक असा प्रकार पाहण्यांत येतो कीं, दोघे भाऊ असले ह्मणजे त्यांच्या आईची प्रीति बहुतकरून त्यांतून एकावर असती; मग ती दुसऱ्या नावडत्याचें चहुंकडून उणें पाहती. प्रथम तर ती त्याचें व त्याच्या बायकोचें वितुष्ट पडण्याचा प्रयत्न करिती. नंतर त्या वितुष्ट पडलेल्या स्त्रीपुरुषांस लेकरें असलीं तर त्याचें व बापाचें वैर करण्यास ती उपाय योजिती तेणेकरून त्यांच्या बापाची त्यांजवरील प्रीति उडविल्यावर मग त्यास (त्या नावडत्या लोकास) दुसरें लग्न करायाची भर देऊन तोहि हेतु पूर्ण करविती. याप्रमाणें सर्वरीं त्याच्या कुटुंबाचे हालहाल करण्यास ती दुष्ट आई कारण होती.

वृ० गृ०— याप्रमाणें अनर्थ बहुत कुटुंबांत होतात. आणि आपण सांगितलेल्या प्रकारचे कुटुंबांत आईची प्रीति कनिष्ठ पुत्रावर असती, आणि जेष्ठ पुत्राचें अनहित व्हावें ह्मणून ती त्यास प्रथम त्याच्या बायकोपासून, व मुलांपासून दूर करून मग त्यास दुसरें लग्न करायास सांगती, असेंहि म्या बहुत ठिकाणीं पाहिलें आहे. अशा दुष्ट स्त्रिया व दुष्ट पुरुष पाहून मला मोठें दुःख वाटतें

व फार राग येतो. अशा गोष्टींची सरकार कां बरें चौकशी ठेवीत नाहीं ?

त० वि०— हें काम सरकारचें नव्हे. कोणी कोणावर जुलूम जास्ती केली तर त्यांस सरकार शिक्षा करील, पण असलीं घरांतील गुप्त खटलीं त्यास समजतील कसीं, व तें त्याचा बंदोबस्त करूं शकत नाहीं. या कामास लोकानीच स्वतां सुधारलें पाहिजे. त्यांस नीतिज्ञान प्राप्त झालें व त्यांच्या बायका विद्या शिकून चांगल्या शिक्षित झाल्या, ह्मणजे असलीं दुष्ट कर्में त्यांच्या मनांतून आपल्या आपणच निघून जातील. अणखी एक अव्यवस्था असी आहे कीं, आपल्या लोकांत खर्चाचा उधळेपणा फार होतो. तर स्त्रियांचे विद्येपासून कुटुंबांतील खर्चाची चांगली व्यवस्था राहील. त्यांस त्यांच्या नवऱ्यांचा आदाय समजेल, व त्याप्रमाणें घरांत लग्न कार्याच्या प्रसंगीं कर्ज काढून उधळपट्टी न करितां बेतबाताने खर्च करितील; कारण या आपल्या हिंदूंच्या कुटुंबांत लग्नांतील वगैरे खर्चाचें मुख्य संधान बायकाच्या हातीं असतें. तर त्या शाहण्या व दक्ष झाल्या ह्मणजे घरांत ऋणाग्नी शिरणार नाहीं, ज्याच्या योगाने आजपर्यंत बहुतांचा नाश झाला आहे.

वृ० गृ०— बरें, या गोष्टीशिवाय अणखी दुसरे कांहीं लाभ आपल्या लक्षांत येतात कीं काय ?

(४) त० वि०— होय, त्या आपल्या विद्वान व प्रकाशित झालेल्या नवऱ्यांस योग्य सोबतिणी होतील, हें कसें ह्मणाल तर ऐका. आतां जे खऱ्या विद्येच्या व सुशिक्षेच्या योगाने सुधारलेले तरुण आहेत, आणि जे पुढे

तयार होतील, त्यांस या गोष्टीचें मोठें अगत्य आहे. कारण त्यांची स्थिती सांप्रत असी आहे कीं त्यानी जी नवी विद्या संपादिली आहे, जे नवे विचार त्यांच्या मनांत उत्पन्न होत आहेत व जीं मतें त्यांस खरीं वाटत आहेत, त्यांमुळें जुने लोक त्यांचा अपमान व त्रास करितात. जें कांहीं ते लिहितात किंवा बोलतात तें लोकांस विपरित वाटतें. त्यांची गणना विद्वानांत होत नाहीं. त्यांच्या लोकोपकारी उद्योगास सर्व हसतात. याप्रमाणें बाहेर त्यांची छळणूक होत असतां, घरांतील बायका माणसें व विशेषेंकरून त्या विद्वानाची स्त्री अज्ञान व अशिक्षित असली ह्मणजे मग त्याचे हाल काय पाहावयाचे आहेत? त्या उभयतां स्त्रीपुरुषांच्या मनांतील विचार व मतें परस्पर फार भिन्न असतात. विद्येच्या योगाने त्या पुरुषाच्या मनांत जे नानाप्रकारचे विचार उत्पन्न होतात, व त्यांस जें चमत्कारिक व उपयुक्त ज्ञान प्राप्त झालें असतें त्याविषयीं आनंद वाटायाजोगें संभाषण करायास त्याच्या ठायीं इच्छा उत्पन्न झाली असतां, त्या बापड्याने कोठें जावें? देवाने दिल्हेली आई, बहीण, स्त्री किंवा दुसरीं कुटुंबांतील माणसें असून त्यास काय उपयोग? त्यांस त्याच्या गोष्टीची आवड वाटत नाहीं किंवा अर्थ समजत नाहीं. जर तो त्यांस असें सांगेल कीं, पृथ्वी वाटोळी आहे व ती सूर्याभोंवती फिरती; अथवा हिमालयाचे पलिकडेस देश आहे, व लंकेंत इंग्रज आहेत, तर त्यास सर्व हसतील, व वेडा ह्मणतील. यास्तव त्यास या प्रकारच्या सर्व गोष्टी आपल्या हृदयांत कोंडून ठेवाव्या लागतात. त्याच्या मतास अनुमोदन देण्यास व त्याच्या

आनंदाच्या विभागी होण्यास त्याला घरांत कोणीच मिळत नाहीं. त्याने सिद्ध केलेलें जें विद्यारूप षड्स अन्न त्याची मेजवानी करायास त्याला बाहेरील गृहस्थांस आमंत्रण करावें लागतें, ह्मणजे त्याच्या ओळखीचे जे सुधारलेले असतील, त्यांच्या मंडळींत बसून नानाप्रकारचीं संभाषणें करावीं लागतात. घरांत कुटुंबांचीं मनुष्यें असून त्यांस अज्ञानमोडशीमुळें त्या ज्ञानान्नाची रुची व माधुर्य लागत नाहीं.

वृ० गृ०— मागल्या सोमवारीं आपला शिवराम एक चित्राचें पुस्तक घेऊन वाचीत बसला होता. त्यांत त्याने अशी एक गोष्ट वाचली कीं, कोणी एक पाळलेला पोपट आपल्या पिंजऱ्यांतून निघून अरण्यांत उडून गेला; तेथें दुसरे पोपट होते, त्यांनी त्याची मनुष्यवाणी ऐकून हा कोणी नवा पक्षी आपल्या मंडळींत शिरला आहे असें समजून त्यास बोचबोचून आपल्यांतून बाहेर हाकून लाविला; तसें या नवशिक्यांच्या सांप्रतच्या अवस्थेविषयीं आहे. ते आपल्या नव्या विद्येविषयीं जुन्या लोकांच्या मंडळींतून बाहेर हाकून लाविल्याप्रमाणें आहेत. अगखी अशा प्रकाराने ज्ञानाची व विद्येची वृद्धि होणार नाहीं.

त० वि०— महाराज, ही आपण त्यांच्या अवस्थेची वास्तविक तुळणा केली आणि जर त्यांच्या स्त्रिया बहिणी विद्या शिकून सुधारल्या नाहींत, तर त्यांचें दुःख विशेष वाढेल. या कारणास्तव आपल्या नवऱ्याप्रमाणें स्त्रिया शाहण्या झाल्या ह्मणजे त्या उभयतांच्या विद्येचें

सार्थक होईल. आतां अणखी एक कारण मला सुच-लें आहे, तें सांगून मी आपलें संभाषण संपवितों.

(५) आपले हिंदुलोक असें समजतात कीं स्त्रियांस ईश्वरसंबंधी व धर्मसंबंधी विचार करण्याची गरज नाहीं. परंतु ही त्यांची मोठी गैर समजूत आहे. धर्माविषयीं स्त्रीस पुरुषाप्रमाणेंच स्वतंत्रता असावी.

वृ० गृ०– असें कां ह्मणतां? आमच्या बायका तर पुष्कळ व्रतें व उपवास करितात व ब्राह्मण जसें सांगतील तसें वर्त्ततात.

त० वि०– खरें, परंतु त्या व्रतांपासून त्यांस कोणत्या गोष्टींचें ज्ञान होतें बरें? त्यांचीं कर्में तर अर्थरहित व त्रासदायक असतात. त्यांस ब्राह्मण असें सांगतात कीं, अमुक दिवशीं अमकी भाजी खाऊं नये. अमक्या दिवशीं भात जेवूं नये. अमक्या दिवशीं पाणी पिऊं नये. अमक्या रात्रीं, अमक्या दिवशीं खालीं जमिनीवर निजूं नये, बसूं नये. अमक्या दिवशीं कोणाबराबर बो-लूं नये, अमक्या दिवशीं एकशे आठ वेळा आंग धुवावें. अमुक करावें, तमुक करावें असें सांगून त्यांजकरवीं व्रतें व उपवास करवितात, ते कोठवर सांगत बसावें? त्यां-तून बहुतेक व्रतें व उपवास असे आहेत कीं, त्यांपासून शरीरप्रकृती बिघडती, रोग होतो. मनास कंटाळा व त्रास येतो, व एकदां हें कसेंहि आटोपून यांतून लवकर सुटका होईल तर बरी, असी वारंवार इच्छा होती. तसेंच द्रव्यापव्यय व कालापव्यय ही मोठीं हानी होती. बरें, ब्राह्मणाच्या सांगण्यावरून इतकीं व्रतें व उपवास करूनहि त्या तिळप्राय तरी शाहण्या होतात ह्मणावें तर उलटें

त्यांचें अज्ञान अधिकाधिक वाढत जातें. जर एखादीस पुत्र नसला व एखादीचें लेंकरूं दुखण्यांत पडलें अथवा एखादीवर नवऱ्याची प्रीति नसली, अथवा कोणाचीं लेंकरें वांचत नसलीं, अथवा कोणाची सून नांदत नसली, तर त्या भलभलते वेडे उपाय करितात. अंगांत अवसर आणणारे, पंचाक्षरी मांत्रिक, जादुवाले व दुसरे पुष्कळ ठक भोंदू लोक या सर्वांची उपजीविका बहुतकरून बायकांच्या अज्ञानावर चालते. आणि या अज्ञानामुळें पुष्कळ कुटुंबाची हानी झाली आहे, व सांप्रत होतहि आहे, तिचें सविस्तर वर्णन करण्यास मला अवकाश नाहीं. परंतु सांगायास कारण हेंच कीं, जर आपल्या स्त्रिया अज्ञानांत असल्या तर त्यांचा संसार व कुटुंब कधीं सुखी होणार नाहीं. ज्या भगवंताने त्यांस उत्पन्न केलें आहे त्यास सोडून आपणासारिखें दुःखाने पीडित व दुर्बळ जें मनुष्य त्यापासीं गेलें असतां तें बापडें काय बरें करील?

वृ० गृ०— हें खरें; पण स्त्रियांस हा विचार कोठून उत्पन्न होईल?

न० वि०— त्या सुसिक्षित झाल्याविणा होणार नाहीं, हें तर उघडच आहे. आणि ईश्वरासीं आपण कोणत्या रीतीने वागावें, तसेंच आपणासीं व लोकासीं कसें वागावें व या पृथ्वीवर आपलें काम कोणतें आहे व एथून आपण कोणत्या स्थळीं जाणार हें सर्व समजावें ह्मणून त्यांस ईश्वरोक्त शास्त्राचें ज्ञान झालें पाहिजे, व त्याची त्यांस गरज आहे असें वाटण्यास सृष्टिजन्य ईश्वरीज्ञानाचा अभ्यास केला पाहिजे, व तो करण्यास मूळ विद्याभ्यास

पाहिजे. अणखी केवळ धर्मसंबंधी ज्ञानाकरिताच विद्या शिकावी असें नाहीं, तर नीतिज्ञान होण्यासहि विद्वान लोकांचे ग्रंथ वाचले पाहिजेत. सारांश इतकाच कीं सर्व विद्येचा व सर्व प्रकारच्या ज्ञानाचा कल मुख्यत्वें ईश्वरी ज्ञानाकडेस असला पाहिजे. नाहीं तर बहुत विद्या प्राप्त करून घेऊन शेवटीं निरीश्वरमतवादी होऊन बसणें अथवा ईश्वराचें अस्तित्व मान्य करून त्यानें लावून दिलेला धर्मच नाहीं असे खोटे सिद्धांत व निर्णय करीत बसणें हें तूस कांडून हातास फोड आणण्याप्रमाणें मात्र आहे.

वृ० गृ०— आपणास मी कालपासून बहुत श्रम दिले, मला त्याविषयीं क्षमा असावी. आतां मी ईश्वरापासीं अंतःकरणपूर्वक प्रार्थना करितों.

हे दीनदयाळा देवा जें कांहीं मी या विद्वान पुरुषाच्या मुखांतून ऐकिलें आहे त्याजवर तुझें आशीर्वचन असो, व तें माझ्या अंतःकरणांत आम्रवृक्षाप्रमाणें वाढून त्याजपासून माझ्या स्वदेशीय लोकांस पक्व व सुरस असीं फळें प्राप्त होवोत. हे सर्व श्रेष्ठ करुणासागर देवा, आह्मी आजपर्यंत आमच्या स्त्रियांचें अज्ञानेंकरून जे हाल केले, त्यांची आह्मास क्षमा कर, व आतां तूं त्यांचा साह्यकारी होऊन आह्मा दीनांच्या हातून हें आरंभिलेलें कार्य सिद्धीस ने. या देशांतील स्त्रिया दास्यत्वापासून मुक्त होतील असा दिवस आह्मास सत्वर दाखीव. जें मी या मित्रापासून श्रवण केलें आहे, तें बहुतांच्या कानीं पडो व त्यांस आपला दोष स्पष्ट दिसून त्यांच्या अंतःकरणास दयेचे पाझर सुटोत व त्यांच्या योगानें स्त्रियांचीं सर्व

दुःखें वाहून देशांतरीं जावोत. हे विश्वसंतापहारका, मज-दीनाची प्रार्थना तुला मान्य होवो. तथास्तु.

न० वि०— जर तुह्मी हें काम करायास प्रारंभ कराल तर ईश्वर निःसंशय तुह्मास साह्य करील. आतां आपण प्रथम माझी एक विनंती मान्य करावी ह्मणजे तुह्मी ह्मट-लेल्या प्रार्थनेंतील आम्रवृक्षाचें पहिलें फळ मला दिल्याप्र-माणें होईल. आपल्या भागीरथीस मजबरोबर मुंबईस पा-ठवावें ह्मणजे तेथें ती मुलींच्या शाळेंत उत्तमप्रकारें विद्या-भ्यास करील.

वृ० गृ०— तुह्मी आज भगीरथ प्रयत्न करून भागी-रथीस घेऊन जात आहां. कारण मजसारिख्या अभि-मानी वृद्धाची जुनाट व हट्टी समजूत ताळ्यावर आणून माझ्या मनांत हा सद्विचार भरून देणें हें कांहीं सामान्य काम नव्हे. हा तुमचा खरोखरच भगीरथ प्रयत्न झाला. तर आतां भागीरथीस खुशाल घेऊन जावें. एथें आमच्या पुण्यांतहि एक मुलींची शाळा हलीं निघाली आहे, असें ऐकितों, तर मला तेथें जाऊन पाहायाचें आहे; व कांहीं द्रव्य त्या शाळेच्या खर्चाकडेस द्यावें, अशी इच्छा उत्पन्न झाली आहे. भागीरथीस इकडे ठेविली असती, परंतु ती आपल्यापाशीं असली ह्मणजे तिला सद्गुणाचा व सदाच-रणाचा सर्वदां कित्ता मिळत जाईल. ईश्वर करो, आणि ती चांगली विद्वान होऊन आपल्या देशांतील पुष्कळ स्त्रियांस व मुलींस अज्ञानावस्थेंतून काढण्यास कारणभूत होवो.

---

# माहाराष्ट्र देशांतील सूज्ञ विचारवंत व संभावित गृहस्थांसीं भाषण.

हे माझे प्रिय स्वदेशीय बंधुजन हो,

तुह्मी हा मागें लिहिलेला संवाद चित्त लावून वाचून त्यांतील गोष्टींचा निःपक्षपातानें विचार करा; त्या गोष्टी खन्या किंवा खोट्या आहेत हें शोधून पाहा; स्त्रिया अज्ञान व अशिक्षित असल्या ह्मणजे देशाची केवढी हानी होत्ये ती लक्षांत आणा; तुमच्या देशाची स्थिती कोणत्या प्रकारची आहे ती पाहा, व ती तसी होण्यास कोणकोणतीं कारणें झालीं आहेत, आणि तीं कशानें सुधरलीं जातील, हें पाहा. या मागल्या संवादावरून तुह्मास समजेल कीं, तुमच्या स्त्रियांचें अज्ञान हें एक तुमच्या देशाचें दुर्बळतेचें कारण होय. तर त्याविषयीं तुह्मी कांहीं काळजी बाळगीत नाहीं, हें मोठें आश्चर्य आहे. तुह्मी स्वतां कितीहि विद्वान झालां, तरी तुमच्या स्त्रिया अज्ञान असल्यामुळें तुमची सर्व विद्या व सुधारणूक, तुह्मास अर्धांग वायूनें पीडीत झालेल्या पुरुषाप्रमाणें होईल. त्यास जसें आपल्या रोगिष्ट अंगामुळें दुसरे धडसे अवयव जड ओझ्याप्रमाणें वाटतात, तसें तुमचें कला कौशल्य, नीति व आचरण, तुमच्या स्त्रिया मूर्ख असल्यानें होईल. यास्तव जर तुह्मी आपल्या विद्येपासून स्वदेशकल्याण करूं इच्छितां, तर प्रमथ तुमच्या स्त्रियांस व कन्यांस विद्वान व सुशिक्षित करा, ह्मणजे तुमचे मनोरथ सिद्दीस जातील.

स्त्रियांच्या योगानें देश सुधारतो ही गोष्ट कदाचित्

तुह्मास खरी वाटणार नाहीं; तर इच्या खरेपणाकरितां मी तुह्मास युरोप खंडाचें उदाहरण देतों. त्याजकडेस पाहून विचार केला असतां माझ्या बोलण्याचें प्रमाण तुमच्या लक्षांत येईल. पाहा! तेथील लोकांची सांप्रत कोणती स्थिती आहे. ते शरिराने सुदृढ, मनाने बुद्धिवंत, धर्माचरणांत नैष्ठिक, विद्येंत परिपूर्ण, कलाकौशल्यांत निपूण, युद्धांत शूर, व्यवहारांत प्रमाणीक, ऐश्वर्याने संपत्तिवान, असें कां आहेत? त्याचीं कारणें शोधलीं असतां तुह्मास पुष्कळ सांपडतील. परंतु त्यांतील मुख्य कारणांत त्यांच्या स्त्रियांची उत्तम स्थिती हें एक आहे. तुह्मी आपल्या व त्यांच्या स्त्रियांची तुळणा करून पाहा, त्या रूपाने सुंदर, स्वभावाने सद्गुणी, बुद्धीने प्रकाशित व लोकांत सन्मान्य अशा आहेत. त्यांच्या कुटुंबांत तुह्मी जाऊन पाहाल, तर जेथें ईश्वराची सद्रीति धरून मनुष्यें वागतात, तेथें कज्जा भांडण दिसणार नाहीं. जिकडे तिकडे प्रीति, शांती व एकोपा; व सर्व मनुष्यें परस्परांचें हित इच्छून एकमेकांस साह्य करितात, असें तुमच्या दृष्टीस पडेल. आतां तिकडून लक्ष काढून आपल्या देशाकडे व कुटुंबाकडे लावून पाहा; एथील लोक किती गरीब व अज्ञान आहेत. आणि त्यांत नीतिवंत, सद्गुणी व सदाचरणी असे थोडेच मिळतील. तसेंच तुमच्या कुटुंबांत जिकडेतिकडे कलह, द्वेष, वैरभाव, हेवा, मत्सर, हे दृष्टीस पडतात; व त्यांत अज्ञानी बायकांचे मुर्खत्वाने तर अधिकच विध्वंस होत असतो. तर ही गोष्ट तुमच्या मनांत पक्की ठसावी कीं ही तुमची दुर्दशा तुमच्या अशि-

क्षित स्त्रियांपासून आहे, व त्या सुशिक्षित झाल्या तरच तुमचा ऊर्जित काळ येईल.

आजपर्यंत तुह्मी आपल्या स्त्रियांस दास्यावस्थेंत ठेविलें तेवढें पुरे. ईश्वर त्याची तुह्मास क्षमा करो. पण अतःपर जर तुह्मी सुबोध न ऐकाल व आपल्या मूर्ख समजुतींतच राहाल, तर तुमचा अपराध मोठा वाढेल. स्त्रियांस विद्या शिकवूं नये ह्मणून ज्या तुह्मी शंका आणितां त्यांचें म्या यथामतीने या संवादांत समाधान केलें आहे. तर आतां डोळे झांकून बसूं नका; परंपरागत चालीचे दास होऊं नका; अज्ञानाचे बंदांत राहूं नका; लज्जा सोडा, धैर्य धरा, ईश्वराचें साह्य मागा; व कोणाच्या बोलण्याचें भय न बाळगितां आपापल्या कन्यांस, बहिणींस व बायकांस विद्या शिकवा. त्यांची योग्य स्वतंत्रता व योग्यतेनुसार मान त्यांस द्या.

विचार करा कीं त्या तुमच्या हातांत ईश्वराने दिल्ह्या आहेत, आणि तुह्मी त्यांस जनावरांप्रमाणें वागवितां, हें योग्य आहे कीं काय? जसा तुमचा त्यांजवर जुलूम आहे, तसा दुसऱ्याचा जुलूम तुह्मी सोसाल कीं काय? तुह्मास जर एखादा जुलमी धनी मिळाला तर त्याची तुह्मी चाकरी सोडाल. पण तुमच्या बायकानी काय करावें? कोठें जावें? परमेश्वराने व त्यांच्या आईबापाने त्यांस तुमच्या स्वाधीन केलें आहे, व त्यानी तुह्माजवळच निरंतर राहावें हा त्यांचा धर्म होय., परंतु त्या परतंत्र असतांना तुह्मी त्यांस अज्ञानावस्थेंत ठेवून पशूप्रमाणें त्यांजपासून चाकरी घ्यावी हा तुमचा अधर्म होय.

ज्या देवाने तुह्मास उत्पन्न केलें त्याच ईश्वराने तुमच्या

स्त्रियांस उत्पन्न केलें. आणि तुमच्याप्रमाणें त्यांस मन, बुद्धि, इच्छा, वासना, हीं दिल्हीं आहेत, व त्यांजवरील तुमच्या धनीपणाचा हिशोब घेणारा आहे, कारण तोच मोठा धनी आहे. तर न्यायाच्या दिवसीं तुह्मास आपला हिशोब द्यावा लागेल. आतां तुह्मी त्यांस आपल्या उत्पन्न-कर्त्याविषयीं कांहीं कळवीत नाहीं, तर ही मोठी दुःख-कारक व भयंकर गोष्ट आहे. ईश्वराविषयीं व धर्माविषयीं अज्ञान राहणें हें केवढें पातक आहे, व त्याचें पातक किती कठीण असेल हें कोण सांगूं शकेल? तर तुमच्या अपराधाचीं निमित्तें चालणार नाहींत. आणि आतां विशेषेंकरून तुह्मास हा दोष स्पष्ट दाखविला आहे. आणि जर आतां या गोष्टीची हयगय कराल, तर त्यांत तुमचीच हानी आहे.

कित्येक अविचारी व अज्ञानी लोक ह्मणतील कीं, तुह्मी ही नवीन चाल कोठून काढितां? तर त्यांस या मागल्या संवादांत उत्तर दिल्हें आहे, व आतां तुह्मास सांगतों कीं, स्त्रियांस विद्या शिकविण्याच्या स्तुत्य उद्योगास लोकनिंदेचें भय धरून राहाल तर आपल्या सुखास मुकाल; व अशा कामाची जे निंदा करितात, ते आपणास ईश्वरापेक्षांहि शाहणे ह्मणविणारे आहेत. तर अशांचें भय कां बाळगावें?

पाहा! आतांची वेळ पुनः येईल हा भरवसा नाहीं. तुह्मास संप्रत पृथ्वींतील मोठ्या विद्वानाची व सुधारलेल्या लोकांची अनायासानें संगत प्राप्त झाली आहे. तर तिजपासून तुह्मी स्वहित साधून घ्या. विद्येपासून मनुष्याच्या स्थितींत कोणता चमत्कारीक पालट होतो तो पाहण्या-

स्तव तिचा तुमच्या स्त्रियांवर प्रयोग करून पाहा. सांप्रत तुह्मावर जे अधिकार करितात ते पूर्वींपासूनच सुधारलेले व विद्वान होते असें नाहीं. तर ते आज एक हजार वर्षांपूर्वी केवळ जंगली व अज्ञानी होते. त्यांचा धर्म व रीति भाती या फार निराळ्या असून नीच, अमंगळ, भ्रष्ट, घातकी, व शरिरास व मनास अनिष्टकारक अशा होत्या. परंतु खरा धर्म प्राप्त झाल्यामुळें विद्या व ज्ञान यांची आवड धरून ते कलाकौशल्याचा शोध करूं लागले, व आपल्या तत्परतेने व चातुर्याने या महत्वास येऊन पोहंचले आहेत. आणि इतक्या थोडक्या काळांतहि त्यांची वृद्धि होण्यास दुसरें मोठें कारण असें कीं, त्यांस त्यांच्या विद्येच्या शोधांत व सुधारणुकीच्या कामांत त्यांच्या स्त्रियांचें साह्य मिळालें तेणेंकरून त्यांस दुप्पट बळ येऊन त्यानी लवकर मार्ग क्रमिला. परंतु तुह्मी व तुमच्या बायकानी त्याप्रमाणें कांहींच खटपट न करितां अज्ञानाची गाढ झोंप लागण्याची मात्र सामोग्री केली. ती कोणती ह्मणाल तर ऐका; शरीररूप पलंगावर आळसाचा त्रिछाना पसरून बुद्धि उशास घेऊन वर अभिमानाची पासोडी घेतली, आणि त्याजवर अविचाराचे पडदे पाडून आज दोन अडीच हजार वर्षें खुशाल गाढ निद्रेंत घोरत होतेत. तशांत तुमच्या बायकानी अज्ञानाचे पंखे घेऊन मूर्ख समजुतीचा तुह्मावर वारा घातला; तेणेंकरून तर अधिकच गार झोंप लागली. परंतु आतां ईश्वरकृपेने विद्याभेरीचा नाद तुमच्या कानीं पडून, तुह्मी जागे झाले आहां. तर पुनः त्या दुष्ट निद्रेची आवड न धरितां पुरें सावध होऊन आपल्या भोवतां काय

होत आहे व आपण कोणत्या स्थितींत आहों हा सर्व विचार करून आपली सुधारणूक करून घ्या.

हे माझे स्वदेशीय बंधुजनहो, तुह्मास म्या आतां विशेष सांगावें असें नाहीं. स्त्रियांस बंदांतून मुक्त करण्याचे व सुशिक्षित करण्याचे जे माझे अभिप्राय आहेत, ते या लहान पुस्तकांत लिहून प्रसिद्ध केले आहेत. आतां माझी हीच विनंती आहे कीं, ते तुह्मी स्वस्थ चित्ताने व निःपक्षपाताने वाचावे व त्यांत जें सत्य असेल त्याचें ग्रहण करून त्याप्रमाणें वर्त्तणूक करून यशाचा ध्वज उभारावा. तुमचीं मुलें स्वभावाने सौम्य, सात्विक, दयाळू, धार्मिक, परोपकारी व प्रमाणीक अशीं व्हावीं, असी जर तुमची इच्छा आहे, तर आधीं त्यांच्या आईस अशा गुणाचे मार्ग दाखवून द्या; ह्मणजे त्यांची संतती त्यांप्रमाणेंच होईल.

बंधुजनहो! तुह्मास कदाचित मी फार वेळ थांबविलें असेल, तर आतां मी तुमची आज्ञा घेतों. तुमचे व तुमच्या स्त्रियांचें व तुमच्या देशाचें ईश्वर कल्याण करो.

समाप्त.